श्रीमिश्रित तनु आश्रितजनप्रतिपालक राजश्री ।
श्रीवत्सल श्रीपाद विवरती वेदांती मिश्री ।
श्रीकंठासी विष श्रम देतां रामनाम आश्री ।
श्रीहरिनामें अमृत फिकें मग कोण पुसे मिश्री? ॥ **पांडुरंग०** ॥ १ ॥
पांडित्यासी बरें निरउनी पांगुळ मन होपा ।
पांसु पाईचे पांघुरतो **शिव** गिरिकंदर सोपा ।
पांथमुक्त मार्गिंचे विसावत पदपंकजखोपा ।
पांडत्रयत्री जगचि पुरें करि कृपापांग सोपा. ॥ **पांडुरंग०** ॥ २ ॥
डुबकी मारुनि कूर्मपणें धरि **मंदर हरि** कंडू ।
डुकर मीन तव गोकुळिं खेळे चेंडु विटीदांडू ।
डुमडुम डमरू **शिव** नमी आंगें उद्धरिला **पंडू** ।
'डुकृञ् करणे' सांडुनि हृदयीं **पांडुरंग** मांडू. ॥ **पांडुरंग०** ॥ ३ ॥
**रं**गनाथ रंगतलं चिंतय नवनीतापरं ।
रंगनील वदे **य**शोमतिसुत विशोक सुकिशोरं ।
**रं**भादिक नाचतां लाजती तं जगदाधारं ।
रंग **कं**सकृत भंगकारक भज वारंवारं. ॥ **पांडुरंग०** ॥ ४ ॥
गयागदाधर गयारिगयपद सारिगमपधनि सरागं ।
गगनीं सुरवर गर्जति समपद **विठ्ठल** श्री**रं**गं ।
गजनागयुगादि दारक उद्धरत नगपन्नग सांगं ।
गजेंद्रतात गिरी शेष करी धरी पदमिश्रित**गां**गं. ॥ **पांडुरंग०** ॥ ५ ॥
**वि**ठ्ठल म्हणतां विज्ञानुभवें निजजन बहु निववी ।
ठकार ठाण कटिकर शून्य अज्ञाना नुरवी ।
लय दाउनि **लक्ष्मी**सह भेटुनि देत आत्मपदवी ।
**अ**मृतेश्वर कटिबंध जनाच्या रसनेनें वदवी. ॥ **पांडुरंग०** ॥ ६ ॥

## पद ३८ वें.

पतीतपावन दीनोद्धारण मूर्ति दिसे गोजरी । विटेवर उभा तो श्री**ह**री. ॥ध्रुवपद.
उपमन्या क्षिरसिंधु देउनि तयाची केली शृती । तुझि बा! नवनिधी संपती, ॥
अजामेळ **वा**ल्मिक **ना**रद उद्धरिले सहज स्थिती । तुझि बा! उपमा सांगूं किती ?॥
**प्र**ल्हादभक्तासाठीं धरुनि अवतार खांबाप्रती । **हि**रण्यकश्यपा दिधली गती, ॥
**पुं**डलिकाचे भक्तिस्तव तो आला गा **पं**ढरी । विटेवर० ॥ १ ॥

रामावतारीं युद्ध केलें अचाट महादारुण । मारिला कुंभकर्ण रावण, ॥
तेहतिस कोटी देव सोडविले बंदीशाळेंतुन । लंका बिभीषणा कारण, ॥
वामन होउनी मागाया आला दिल्हें बळिनें दान । घातलें पाताळीं नेउन, ॥
सा चौ नकळे अठरा पुराणां शेषाची वैखरी । विटेवर० ॥ २ ॥
दुर्योधनानें कपट करुनी लाक्षाजोहार केलें । तेथें पांडवांसि रक्षिलें, ॥
अंबऋषीचे साठीं देवें दहा अवतार धरियले, । अहिल्याशिळेसि उद्धरिलें, ॥
गजेंद्रासी नक्रें धरिलें तेव्हां सोडविलें, । ध्रुवासी अढळ पद दीधलें, ॥
सुदामजीचे पोहे भक्षुनि दिधलो कांचनपुरी । विटेवर० ॥ ३ ॥
वसुदेव देवकीचे वचनीं देवें धरिला अवतार, । मारिला मामा कंसासुर, ॥
अघासूर बघासूर आले तुझ्या प्राणावर, । मारुनि केला त्यांचा संहार, ॥
मामळभट पूतना मावसी आले तुझे प्राणावर । मारुनी केला त्यांचा उद्धार, ॥
नंद यशोदा कुळदैवत नवनीत भक्षण करी । विटेवर० ॥ ४ ॥

### पद ३९ वें.

धांव पाव सद्गुरुराया ! । गुणियाच्या गुणिया ! सखया ! ॥ ध्रुवपद. ॥
अज्ञानाचें जें वारुळ । त्यांत दोरीचें महांडुळ[2] ।
डसलें नसतां हीं समूळ । उगेंच मन हें भय पावे. ॥ धांव० ॥ १ ॥
नव छिद्रांची फुटकी नाव । तींत येकाचाचि टिकाव ।
मृगजळडोहीं गेला आव । नकळे माव हे याची. ॥ धांव० ॥ २ ॥
शुक्तिरुप्याचे[3] रुपये केले । त्याजवर स्थाणु चोर आले ।
अमृतसमान मूर्ख चेले । यास्तव तुजला श्रमविती. ॥ धांव० ॥ ३ ॥

## उपदेशपर पदें.

### पद ४० वें.

अरे अरे ! कांहिं तरी सोय धरीं रे ! ।
परम वरदकर सुरुचिरतर नरनारायणपर धरुनि धरणिधर अनुदिनिं मनिं जप करीं रे ! ॥ ध्रुवपद. ॥
नंदनंदन गोविंद दीनजनबंधु भवसिंधु उतरीं रे ! ।
करुणार्वरुणालय[4]शरणागतपरिपालनपद वरीं रे ! ॥ अरे० ॥ १ ॥

---

१. शेवटीं कविनाम नसल्यामुळें हें पद अमृतरायाचेंच कीं काय याविषयीं संशय आहे. २. एक प्रकारचा साप. ३. जींत मोत्यें असतात अशी शिंप. ४. समुद्र.

पशुसम होउनि विषयीं न रत तूं परत परत अंतरीं रे! ।
भरीं भरुनि तूं घरीं रमसि परि श्रमसि गहन भवपुरी रे! ॥ अरे० ॥ २ ॥
अमृतराय तव पाय धरुनियां विनवी बहु बहु परी. रे! ।
दुर्लभ दुर्लभ नरतनु सखया! वद वद वद नरहरी रे! ॥ अरे० ॥ ३ ॥

### पद ४१ वें.

हे दारा । मांडी घरीं विदारा । रे रे! विषय उदारा । या स्त्रैण[1] कुजन सरदारा ।
या शरीरमळकेदारा[2] । करीं मुकुंदाराधन भज भज कृष्णा प्रणतमंदारा[3]. ॥ १ ॥
हे कांता । इच्छी मनिं एकांता । नातरि करि आकांता ।
तपते सम रविकांता । गृहकांतारीं कांतारीं[4] हे आठवि तूं श्रीकांता. ॥ २ ॥
हे जाया । इच्छी बाहिर जाया । वसे स्वहित वर्जाया ।
प्रीति न हरिसि भजाया । जायाची तनु रक्षित बाहिर जाऊं नेदि निजाया. ॥ ३ ॥
या मारा[5] । वश्य तुं कीं सुकुमारा । विसरुनि काळकुमारा[6] । खेळवितोसि कुमारा[7] ।
नेणसि भवशुमारा[8] । स्वःसुभारा चित्रगुप्त तो लिहितो दुरित तुमारा. ॥ ४ ॥
हे नारी । विषयबंध नेणारी । मागे कांचन भारी ।
कीं लुगडें जरीकिनारी[9] । नारीकेळतरुच्छाया त्यज भज अमृतेश्वरनारी. ॥ ५ ॥

### पद ४२ वें.

हा देह जाईल रे! । पुण्य कामा येईल. ॥ ध्रुवपद. ॥
मोहित होउनियां विषयीं । किति करसिल बाइल रे! ॥ हा देह० ॥ १ ॥
जोंवरि आंगीं शक्ति जवळि धन । तोंवरि ते गीत गाईल रे! ॥ हा देह०॥२॥
अमृत म्हणे हें सर्व त्यागुनि । हरि हरि म्हणतांचि सार्थक होईल रे! ॥हा देह०॥३॥

### पद ४३ वें.

सखे हो! ब्रह्म सदोदित एक. ॥ ध्रुवपद. ॥
वेदांतश्रवण जइ कीजे । आत्मानात्मविवेक. ॥ सखे हो० ॥ १ ॥
जरी गुरुराज करी करपात्रें । अमृताचा अभिषेक. ॥ सखे हो० ॥ २ ॥

### पद ४४ वें.

हें फार खोटें रे! । हीन केलें पोटें. ॥ ध्रुवपद. ॥
साराचेंहि सार आयुष्य मोठें । तें चाउलें हातबोटें. ॥ हें फार० ॥ १ ॥

---

१. स्त्रीलंपट. २. शेत. ३. कल्पवृक्ष. ४. अरण्य. ५. मदन. ६. वाईट मारहाण. ७. मुलगा. ८. पाणडुकर. ९. जरीकांठी.

रामनाम मुखीं न आलिया । काळ घोटिल एक्याचि घोटें. ॥ हें फार० ॥२॥
सर्वांभूतीं राम नेणुनि । कैसा वाहावसि पाहें लोटें. ॥ हें फार० ॥ ३ ॥
रामनाम जप सांडुनि । व्यर्थ वाग्जल्प कीजे होटें. ॥ हें फार० ॥ ४ ॥
अमृत म्हणे राम चिंतुनि । राहीं संतसमागम जोटे. ॥ हें फार० ॥५ ॥

## पद ४५ वें.

काय केलें रे ! । गुरुचरणीं लागुनी. ॥ ध्रुवपद. ॥
वेद पढुनि निज खेद न जाउनि । भेदनवतीला जरि न शमविलें. ॥ काय० ॥१॥
श्रीमद्भागवताशय ऐकुनि । आग्रहबुद्धिस जरि न दवडिलें. ॥ काय० ॥ २ ॥
सर्वांभूतीं वासुदेव हें नेणुनि । हरिचें चित्त दुखविलें. ॥ काय० ॥ ३ ॥
अमृत म्हणे सम सकळहि लोकीं । भला भला जरि वाक्य न म्हणविलें.॥काय०॥४॥

## पद ४६ वें.

काय केलें रे ! । या नरदेहीं. ॥ ध्रुवपद. ॥
बये बये म्हणउनि पिउनि पय भययुत हरि सयेविण क्षय शिशुवय करविलें. ॥१॥
तरुणसमय तइं हृदय विषयमय थै थै थै सह गायन ऐकिलें. ॥ २ ॥
भय नैय[1] रैय[2] गत मनहैय[3] फिरवुनि अविनय तनय तनय आट हे चेवले. ॥३॥
अँव्यय[4] विसरुनि नरतनु व्यय कृत अमृत म्हणे जय जय हरि हरविलें. ॥ ४ ॥

## पद ४७ वें.

म्हणउनी हरि भजिजे हरि भजिजे । पदोपदीं संस्मरिजे. ॥ ध्रुवपद. ॥
उंदिर देखुनि वचके । तैसा काळालागिं न दचके. ॥ म्हणउनि० ॥ १ ॥
दाटति कंठ कफानें । नाना देहीं उठति तुफानें. ॥ म्हणउनि० ॥ २ ॥
अंगडी पगडी शाल दुशाला । अंतीं लेता होय कशाला. ॥ म्हणउनि० ॥३॥
वरडुनि घाबरे करिती । असली बुद्धि तेही हरिती. ॥ म्हणउनि० ॥ ४ ॥
समयीं म्हणती पैका वेंचू । अंतरीं सहस्र तिडका विंचू. ॥ म्हणउनि ॥ ५ ॥
लागली देखुन उचकी । स्त्री सुत बंधु पैका उचकी. ॥ म्हणउनि० ॥ ६ ॥
कंठीं कुडक्या मुद्या । अवघी संपत जाईल उद्यां. ॥ म्हणउनि० ॥ ७ ॥
अमृतेंविण मति बरळा । अंतरीं सावध तो एक विरळा. ॥ म्हणउनि० ॥ ८ ॥

१. न्याय. २. वेग. ३. घोडा. ४. ज्याचा नाश होत नाहीं असा.

### पद ४८ वें.

वैराग्यभाग्यासारिखें आणिक भाग्य नाहीं. ॥ ध्रुवपद. ॥
परि तो विवेक मुख्य असावा । साधनमात्रालागिं विसांवा ।
संतसमागम हा गंवसावा । संशय सकळ पुसावा ।
किमपि नसावा कांहीं. ॥ वैराग्य० ॥ १ ॥
डोइस टोपी कीं चिंधोटी । गडवा पुरे एक लंगोटी ।
समयीं भाकरतुकडा रोटी । वस्ती पर्णकुटीं ।
हरी हरी जपूनी राहीं. ॥ वैराग्य० ॥ २ ॥
जुन्या चिरगुटांची भरती । कंथा असो पाठीवरती ।
वितभर भुई आंगापुरती । देह ममता सांडुनि परती ।
सच्चिदानंद पाहीं. ॥ वैराग्य० ॥ ३ ॥
हत्ती घोडे पालख्या उंटें । त्याचे मागें उदंड झटें ।
कारभाराचें व्यसन खोटें । जैसे फुटके पेटे ।
बुडविती मध्यप्रवाहीं. ॥ वैराग्य० ॥ ४ ॥
सेवक अमृतराय संतांचा । हाचि पूर्ण मनोरथ त्याचा ।
अर्पित काया मन वाचा । अंतर्बाह्य व्यापक साचा ।
यासी विठ्ठल रुक्मिणी मायी. ॥ वैराग्य० ॥ ५ ॥

### पद ४९ वें.

होतां सद्गुरुवरदान । प्राप्त झालें ब्रह्मज्ञान ।
तेथें संसाराचें भान । आहे आहे नाहीं नाहीं. ॥ १ ॥
सेवितां श्रीगुरुकुळ । ब्रह्म त्रैलोक्य गोकुळ ।
दारापुत्र अनुकूळ । आहे आहे नाहीं नाहीं. ॥ २ ॥
तुटली संसाराची झोल । भक्षीं वाळलाचि बेल ।
सांजोळे दिव्यासी तेल । आहे आहे नाहीं नाहीं. ॥ ३ ॥
पुरे घोंगडेंसें छीट । भिकेचें चिमूट पीठ ।
तेथें भाकरीसी मीठ । आहे आहे नाहीं नाहीं. ॥ ४ ॥
पोट मात्र भरायास । न करी कोठेंही सायास ।
तुटकें खेटर पायांस । आहे आहे नाहीं नाहीं. ॥ ५ ॥
पोटिं लागतांचि भूक । न म्हणें शिळें ना साजूक ।
पोळी पातळ नाजूक । आहे आहे नाहीं नाहीं. ॥ ६ ॥

होतां अंतरीं निष्काम । मुखीं आलें रामनाम ।
तेथें मृदंगाचें काम । आहे आहे नाहीं नाहीं. ॥ ७ ॥
साचा अमृत परमार्थ । न करी कोणासीं वादार्थ ।
घरिं लागला पदार्थ । आहे आहे नाहीं नाहीं. ॥ ८ ॥

### पद ५० वें.

अरे ! तूं भुलूं नको नटूं नको । स्वहिता अंतरसील. ॥ ध्रुवपद. ॥
हा देह पांचांचा पांचांचा । पांचजण नेतील ।
जीव हा अज्ञानी न्यायाला । धर्मदूत येतील ।
हिशेब पापाचा पुण्याचा । चित्रगुप्त घेतील ।
केल्या कर्माचें फळ बापा ! । अवश्य ते देतील. ॥ अरे० ॥ १ ॥
वेदशास्त्रांच्या उपदेशें । निरभिमानी होय ।
राहें लीनपणें सर्वांशीं । जैसें पातळ तोय ।
क्षमा आत्मत्वें धरावी । अबोलणीं जणु भूय ।
आत्मविचारें पुसावी । संतजनांतें सोय. ॥ अरे० ॥ २ ॥
वैभव जायाचें जायाचें । पापबळें जाईल ।
सत्ता श्रीहरिची श्रीहरिची । हरि हिरून नेईल ।
होई सावध रे ! सावध रे ! । तरिच बरें होईल ।
क्षेम कल्याणीं कल्याणीं । अमृतेश्वर देईल. ॥ अरे० ॥ ३ ॥

### पद ५१ वें.

या रे ! । सज्जन जन होया रे ! । मनीं धरुनि विनया रे ! ।
होतो नाश वया रे ! । यमास नाहीं दया रे ! ।
हरिगुणकीर्तन श्रवण मनन करू काशी हेचि गया रे ! ॥ १ ॥
जा रे ! । श्रीगुरुलागिं भजा रे ! ।
श्रीहरिलागिं वजा रे ! । निज गुज पर उमजा रे ! ।
अंतर्मुख सुखवृत्ति करुनियां विषयस्मरण वर्जा रे ! ॥ २ ॥
कां रे । जोडुनि बहुत टका रे ! ।
संसारीं अटका रे ! । घडे केंवि सुटका रे ! ।
लोकप्रतिष्ठेसाठीं देशोदेशीं किति भटका रे ! ॥ ३ ॥

सारे। चिन्मयरूपिं असा रे!।
हें गुरुलागिं पुसा रे!। महातत्व गंवसा रे!।
प्रत्यय किमपि न ये तरि क्षणभरि इच्छारहित बसा रे! ॥ ४ ॥
थारे। लोभ मनांत वृथा रे!।
ऐका ईशकथा रे!। लागा संतपथा रे!।
अमृत म्हणे हरिभजनें चुकती जन्ममरणचळथा रे! ॥ ५ ॥

## पद ५२ वें.

होउनि गोसांवी गोसांवी। हरिकथाचि परिसावी. ॥ ध्रुवपद. ॥
गमन नसे ज्या गांवीं। तेथिल वाट कशास पुसावी. ॥ होउनि० ॥ १ ॥
भिक्षा मागुनि निस्पृहतेनें। संगतिचीं पोसावीं. ॥ होउनि० ॥ २ ॥
मिळोत कां खंबाळें। अथवा भगवींही नेसावीं. ॥ होउनि० ॥ ३ ॥
दुर्वाक्यें सोसावीं। आपण अमृतवृष्टि वर्षावी. ॥ होउनि० ॥ ४ ॥

## पद ५३ वें.

कोठें नवजावें नवजावें। श्रीहरिलागिं भजावें. ॥ ध्रुवपद. ॥
दोचौदिवसां घाटा भरडुनि। उदक करुनियां प्यावें. ॥ कोठें० ॥ १ ॥
समयीं आल्या अतीताशी। यथाशक्ति भोजन द्यावें. ॥ कोठें० ॥ २ ॥
स्त्रीपुत्रादिक छळिती। त्यांचें वचन उगीच सोसावें. ॥ कोठें० ॥ ३ ॥
श्रीमद्भागवतालागिं वाचुनि। आपण आपणा उमजावें. ॥ कोठें० ॥ ४ ॥
स्वच्छंदें उठतां बसतां। नामीं अमृतेश्वरासी गावें. ॥ कोठें० ॥ ५ ॥

## पद ५४ वें.

ऐशा योगें भगवंत कैसा भेटे। विषय सेवितां आयुष्य सर्वहि आटे. ॥ ध्रुवपद. ॥
मोहित होउनि फिरती अज्ञानाच्या राती। ज्याला त्याला आवडे पिंवळी माती।
नगबज घालुनियां त्रैलोक्यांत न माती। वितभर पोटासाठीं देशोदेश जाती.॥१॥
रात्रिदिवस अवघा काळ लोटे। रुपये ढवळिती माती त्याचें भूषण मोठें।
जोडुनि आणिती हिरवे पिंवळे गोटे। रचिती उराशिरावरि लोक मोठे. ॥ २ ॥
विंदुगोळक शुक्तिकेंत पडतां स्वाती। त्याला भोळे लोक नेणुनि म्हणती मोती।
पाणीयाची किंमत करिती लक्षुनि ज्योती। हरिगुणश्रवणावांचुनि कंठीं श्रवणीं धरिती
कीटक मारुनि देशीं आळविताती जंतु। शालारिवरमेहेनव(?)कांतण्याचे तंतू।
भूषण मानूनि गौरवितात नातू पंतू। तपायोगें म्हणवितात पंडित किंवा पंतू.॥

---

१. हौस.

करिति अलंकार गौरीवरि कापसाचे । आपण कानीं घालिति काप साचे ।
सेवुनि आशीर्वाद न घेती तापसांचे । तेणें योगें पावती ताप साचे. ॥ ५ ॥
आत्मज्ञाना विरहित देहीं ममता गाढी । पाहुनि आरशांत सरसी करिति दाढी ।
घेवुनि चिमटा पांढरे केंस काढी । आपण सदन्न भक्षुन इतरा कदन्न वाढी. ॥६॥
नश्वर देहासाठीं अक्षय करितो वाडे । गुंतुनि ममता ते कामिनीचे चाडे ।
पुराण ऐकुनि देखत देखत शाहणा नाडे । तो हा अमृत इच्छितो संसाराचे सांडे.[1]॥

## पद ५५ वें.

उगाचि मी कोणा काय म्हणूं? ॥ ध्रुवपद. ॥
ब्रह्मविलोकनिं सोसेल कैसें । जगदाभास कणूं. ॥ उगाचि० ॥ १ ॥
सच्चित्सुखमय एकचि असतां । कैंचा भेद गणूं? ॥ उगाचि० ॥ २ ॥
अमृतसमुद्रीं बा! द्वैताचा । कोठें कूप खणूं? ॥ उगाचि० ॥ ३ ॥

## पद ५६ वें.

जय हरि! जय जय हरि! । जय परब्रह्म श्रीहरि! ॥ ध्रुवपद. ॥
स्वदार सुत गृहिं सदा । रतत मन सदाचरण मग कदा ।
हरि हरि वदा हो! हरि वदा. ॥ १ ॥
नवा दिवस परि जुना । देह हा क्षणांत होइल चुना ।
हरि हरि म्हणा हो! हरि म्हणा. ॥ २ ॥
रक्तमांस गोठुनि कुच गाल । बगाल किति हा दगा ।
हरिपदिं लागा हो! तुम्हि लागा. ॥ ३ ॥
अमृत अधररस नव्हे । नव्हे हा परस्त्रियेचा थुका ।
हरिपदिं चुकाल हो! झणि मुकाल. ॥ ४ ॥

## पद ५७ वें.

हा देह जायाचा उद्यां जायाचा । कदापि नाहीं राहायाचा. ॥ ध्रुवपद. ॥
कारभार हर्ष दासी सेजा । तो हर्ष बुडायाचा. ॥ हा देह० ॥ १ ॥
जाणुनि बुजुनि आळस करिसी । श्रीकृष्ण पुजायाचा. ॥ हा देह० ॥ २ ॥
अमृत म्हणे कधिं छंद हा जाइल । रुपये मोजायाचा. ॥ हा देह० ॥ ३ ॥

---

१. समाप्ति.

## पद ५८ वें.

अखंड हरि हरि वदा रे बापानो ! । किती सेवाल धनदुर्मदा ? ॥ध्रुवपद.॥
काय रानांत आटल्या नद्या । काय तरु म्हणती फळ न द्या ।
किती कांडोकांड मिरवाल मुद्या ।
वाचा एकोबाचा भागवत अध्यारे बापानो ! ॥ अखंड० ॥ १ ॥
काय वाटेसि न मिळती चिंध्या । काय न मिळे भोंपळा दुध्या ।
ह्या तर गोष्टी सुखाच्या सुध्या ।
गेलि घडी आजची नये उद्या रे बापानो ! ॥ अखंड० ॥ २ ॥
काय सांडोनि गोष्टी खऱ्या । काय दुकाळ पडला कऱ्या ।
काय महर्घ तृणाच्या बोऱ्या[1] ।
ह्या तो शुकाच्या गोष्टी बऱ्या रे बापानो ! ॥ अखंड० ॥ ३ ॥
काय लोकीं दारवंट रोधले । काय न घालिति चार जोंधळे ।
हें काय नेणति दुर्मद आंधळे ।
व्यर्थ अमोलिक आयुष्य उधळे रे बापानो ! ॥ अखंड० ॥ ४ ॥
बाहु असतां आपणापाशीं । मग कशासि पाहिजे उशी ।
काय अडचण महदाकाशीं ।
काय पृथ्वी ठाव नेदी कुशी रे बापानो ! ॥ अखंड० ॥ ५ ॥
कर जोडुनि अमृत विनवितो । बाहु उभारोनि गर्जतो ।
जो कां निश्चय धरुनि बैसतो ।
त्यासि हरि बसल्या ठायिं देतो रे बापानो ! ॥ अखंड० ॥ ६ ॥

## पद ५९ वें.

हें तुज कसें कळतें कसें कळतें ? । हरिभजनीं मन चळतें. ॥ ध्रुवपद.॥
षड्रस अन्न करावें । यथासांग पोट भरावें. ॥ हें तुज० ॥ १ ॥
सुंदर वनिता व्हावी । वस्त्रें भूषणें बरवीं ल्यावीं. ॥ हें तुज० ॥ २ ॥
कन्या पुत्र व्हावे । बरवें जामातां मिरवावें. ॥ हें तुज० ॥ ३ ॥
घरीं असाव्या म्हैशी । धनधान्य संग्रहा दासी. ॥ हें तुज० ॥ ४ ॥
बहुत द्रव्य मिळवावें । उभ्या बाजारीं मिरवावें ॥ हें तुज० ॥ ५ ॥
अमृतद्वारीं लोळे । कीर्तनरंगीं जिव्हा खेळे. ॥ हें तुज० ॥ ६ ॥

---

१. चटई, हांतरी.

### पद ६० वें.

जगव्यापका हरीला नाहीं कसें म्हणावें? ॥ ध्रुवपद. ॥
तंतू पटीं मिळाले भूमी नभापरी हो! ।
घट मृत्तिका निराळी ऐसें कसें म्हणावें? ॥ जग० ॥ १ ॥
मुक्ता सुतेज पाणी पुष्पीं सुगंध तो हा, ।
मैलागिरी सुवासा नाहीं कसें म्हणावें? ॥ जग० ॥ २ ॥
गोडी ति साखरेची पाखडीतां नये बा! ।
भिन्नत्व हेम वस्तू ऐसें कसें म्हणावें? ॥ जग० ॥ ३ ॥
मी मागतों तुम्हांला तुम्हि ध्या श्रीपांडुरंगा, ।
अमृतेश्वराचे भजनीं द्वैत कसें म्हणावें? ॥ जग० ॥ ४ ॥

### पद ६१ वें.

बा! तुझा चालता काळ । खायाला मिळती सकळ. ॥ ध्रुवपद. ॥
हे कोण बायकोचे मामे । घरांत वागती रिकामे ।
सगरशेल्याचे रुजामे । भोजनभाऊ केवळ. ॥ बा तुझा० ॥ १ ॥
हे कोण बायकोचे साले । तुपावेगळा घांस न गिळे ।
तांदुळ रांधावे मोकळे । केलें बेंबीचें उखळ. ॥ बा तुझा० ॥ २ ॥
साल्या मेहुण्या घरास येती । फराळाच्या बसती पंक्ती ।
नातें उकरोनी काढिती । अवघा मायेचा गोंधळ. ॥ बा तुझा० ॥ ३ ॥
अमृतेश्वर म्हणे रे मूर्खा! । कां भुललासि मायेच्या सुखा? ।
अंतीं एकटा जाशिल नरका । भज भज श्रीगुरुदयाळ. ॥ बा तुझा० ॥४॥

### पद ६२ वें.

त्याचा हरि विकला हरि विकला । प्रेमें हरिगुण शिकला. ॥ ध्रुवपद. ॥
दो चौं दिवसा वेंची । भाजी चुकाचाकवत सुकला. ॥ त्याचा० ॥ १ ॥
आत्मानात्म विचारी । संतति संपत्ति पूर्ण पिकला. ॥ त्याचा० ॥ २ ॥
सप्रेमें करताळी । देण्याघेण्यावांचुनि सुटला. ॥ त्याचा० ॥ ३ ॥
संतुष्ट यदृच्छालाभें । आनंद ज्याच्या हृदयीं पिकला. ॥ त्याचा० ॥ ४ ॥
अमृत म्हणे भव जिकला । जो नर धनकामिनिवर थुकला. ॥ त्याचा० ॥५॥

### पद ६३ वें.

फिरसी कां पोरा! कां पोरा! । स्वरुपीं हो सामोरा. ॥ ध्रुवपद. ॥
आपणावांचुनि बाहेर पाहातां । जेथें तेथें भांगोरा. ॥ फिरसी० ॥ १ ॥

आत्मसुखप्राप्तीचें साधन । नरतनु उत्तम हेरा. ॥ फिरसी० ॥ २ ॥
**अमृतराय म्हणे परत परत रे! । मूर्खा! फजीतखोरा!** ॥ फिरसी० ॥३॥

### पद ६४ वें.

अशाश्वत संग्रह कोण करी? ॥ ध्रुवपद. ॥
कोण करी परि सोपे माड्या । वस्ति बरी विवरीं? ॥ अशाश्वत० ॥ १ ॥
चिरगुट चिंध्या जोडुनि कंथा । गोधडि हेचि बरी. ॥ अशाश्वत० ॥ २ ॥
नित्य नवें जें देइल **माधव** । भक्षूं तेंचि घरीं. ॥ अशाश्वत० ॥ ३ ॥
आत्मस्त्रीसुत परकी होती । ठेविती भूमीवरी. ॥ अशाश्वत० ॥ ४ ॥
नित्य मिळेल तें नित्यचि भक्षुनी । चिंतिन देव हरी. ॥ अशाश्वत० ॥ ५ ॥
सांडुनि सेवा कल्पतरूसम । भिक्षा हेचि बरी. ॥ अशाश्वत० ॥ ६ ॥
त्रिविधजना त्याजुनि उपार्जन । स्वस्थ बसेन घरीं. ॥ अशाश्वत० ॥ ७ ॥
**अमृत** म्हणे मज भिक्षेचे डोहळे । उठति आशालहरी. ॥ अशाश्वत० ॥ ८ ॥

### पद ६५ वें.

या नरदेहीं स्वच्छंदें सत्संगें सार्थक करा रे! ।
फिरुनि नये हे वेळ भगवद्भजनीं भवजल तरा रे! ॥ ध्रुवपद. ॥
आला पाला वाटुनि गर्गट घेतां पोट भरे रे! ।
चिंध्या जोडुनि कंथा ते पांघुरतां शीत हरे रे! ।
स्वाधिन असतां आपुले उपास पडतिल तेही बरे रे! ।
भाग्य नये सांगातें अहंकारें हरि अंतरे रे! ॥ या नर० ॥ १ ॥
खग मृग कोल्हे व्याघ्र लांडगे भुजंगादिक जाती रे! ।
पराधीन भय मनुष्य देखुनि पळोनियां ते जाती रे! ।
त्यासि उपास न पडती काई पडती ते सोशिती रे! ॥ या नर० ॥२॥
या संसारा अनंत दुःखें पाहतसा चांगलीं रे! ।
अनुभविती अवघेजण परि ते नुमजे देखत भुली रे! ।
आडरानीं फिरतां फिरतां असोनि बुद्धी गेली रे! ।
**अमृतेश्वरासि** स्वकरें धरुनी हरिनें वाट दाविली रे! ॥ या नर० ॥३॥

### पद ६६ वें.

तो नर नित्य सुखी नित्य सुखी । ब्रह्म निरंतर निरखी. ॥ ध्रुवपद. ॥
पांचा साहा दिवसीं । स्वगृहीं शाक सुधेसम लेखी. ॥ तो नर० ॥ १ ॥

कर्ज नसे कोणाचें । प्रवासवर्जित इंद्रिय गुरखी. ॥ तो नर० ॥ २ ॥
शांत दांत निरपेक्षी । करि हरिकीर्तन नामें हरिखी. ॥ तो नर० ॥ ३ ॥
तन धन तृणसम लेखी । जाणे अमृत आपपारखी. ॥ तो नर० ॥ ४ ॥

### पद ६७ वें.

तरिच वांचो रे! वांचो हा देह. ॥ ध्रुवपद. ॥
अन्नशांति करुनि बरी । सकळजना तृप्ति करी. ॥ तरिच० ॥ १ ॥
पंढरीशीं जाइ जरी । हरिचे गुण गाय तरी. ॥ तरिच० ॥ २ ॥
अमृत म्हणे गोष्टि बरी । हेंचि ध्यान राहे जरी. ॥ तरिच० ॥ ३ ॥

### पद ६८ वें.

हरिभजनावांचुनी काय केलें रे! ॥ ध्रुवपद. ॥
दुर्लभ नरतनु वेंचुनि । वाचुनि भागवतासि न वाचुनि उगलें.॥ हरि० ॥ १ ॥
श्रवण करुनि मनन न करितां । निजध्यासनीं अंतर पडलें. ॥ हरि० ॥ २ ॥
निजध्यासाविण साक्षात्कारण । जन्मांतर तें बिज उरविलें. ॥ हरि० ॥ ३ ॥
अमृतवचन हे बुझुनि अजुनि तरि । रिझुनि हरिशि भज सार्थक कथिलें. ॥ हरि० ॥

### पद ६९ वें.

हें मुख किति पाहसिल दर्पणांत? ॥ ध्रुवपद. ॥
बाळपणीं केलें तें गेलें । आठवीं थोरपणांत. ॥ हें मुख० ॥ १ ॥
ध्यानायोग्य हें मन गेलें । तेलमिठासर्पणांत. ॥ हें मुख० ॥ २ ॥
मेले पूर्वज कैसे उमजती । आठवितां तर्पणांत. ॥ हें मुख० ॥ ३ ॥
अमृत म्हणे करणें तें केलें । श्रीहरिचे अर्पणांत. ॥ हें मुख० ॥ ४ ॥

### पद ७० वें.

आग्रह जरि ऐसा । देव भेटेल कैसा? ॥ ध्रुवपद. ॥
मी एक पंडित मी एक वैदिक । मी एक ज्ञानी लैसा. ॥ देव० ॥ १ ॥
विद्यागर्वें उन्मत्त होउनी । आडवी जेंवी म्हैसा. ॥ देव० ॥ २ ॥
मर्द असे संसार कराया । मिळउनी बहु पैसा. ॥ देव० ॥ ३ ॥
आत्मचरित्रें लोकांमध्यें । व्हावी फार प्रशंसा. ॥ देव० ॥ ४ ॥
अमृत म्हणे तूं लीनपणानें । राहीं पाणी तैसा. ॥ देव० ॥ ५ ॥

### पद ७१ वें.

तत्वंपद विचारुनि स्वयंब्रह्म होई रे! ॥ ध्रुवपद. ॥
श्रवण मनन निजध्यास । दुष्कृताचा करुनि नाश ।

धरुनि श्रीगुरुचि कास । अमृतरस घेई रे! ॥ तत्वंपद० ॥ १ ॥
मायामोह दूर करुनि । देह अभिमान त्यजुनि ।
मिठि घाली गुरुचरणीं । याच पथें जाई रे! ॥ तत्वंपद० ॥ २ ॥
जन्ममरण दूर होय । त्यासि असे हा उपाय ।
अमृत म्हणे झालि सोय । यांत भ्रांति नाहीं रे! ॥ तत्वंपद० ॥ ३ ॥

### पद ७२ वें.

प्राण्या! बोलावें बहु गोड. ॥ ध्रुवपद. ॥
दुष्टदुरुक्ती दुर्वचनाची । टाकुनि द्यावी खोड. ॥ प्राण्या० ॥ १ ॥
अंतर बाहिर नबादि साखर । सेवि सुखाची कोड. ॥ प्राण्या ०॥ २ ॥
अमृत म्हणे नरदेहा येउनि । संतसमागम जोड. ॥ प्राण्या० ॥ ३ ॥

### पद ७३ वें.

बाई! माझे नयनीं लागला तार. ॥ ध्रुवपद. ॥
तुर्या देखुनि योगीं रमलें । उन्मनि झालें पार. ॥ बाई० ॥ १ ॥
आहे तें सारुनि नाहीं तें देखिलें । तेथेंचि रमलें फार. ॥ बाई० ॥२॥
गुरुकृपाअमृत अंजन घालुनि । विचारी सारासार. ॥ बाई० ॥ ३ ॥

### पद ७४ वें.

माझी ज्ञानविसांवी । कधिं भेटेल गुरु आई? ॥ ध्रुवपद. ॥
लक्षचौऱ्यांशी हिंडतां शिणलों । तूंच आहे सर्वांठायीं. ॥ माझी० ॥१॥
मायामोहांत मी व्यापून गेलों । कोण सोडविल पाहीं? ॥ माझी० ॥२॥
अमृत बोले सद्गुरुवचनीं । विश्वास ठेउनि राहीं. ॥ माझी० ॥ ३ ॥

### पद ७५ वें.

बाइल पैशाची पैशाची । कधीं नव्हे पुरुषाची. ॥ ध्रुवपद. ॥
जोंवरि धन सुत जोडी । तोंवरि लावी लाडीगोडी. ॥ बाइल० ॥ १ ॥
वेडा बहिरा पिसा । त्यासी देखुन करि कर्कशा. ॥ बाइल० ॥ २ ॥
अमृतराय तुज सांगे । मजला प्रतीति आली आंगें. ॥ बाइल० ॥ ३ ॥

### पद ७६ वें.

श्रीरामाचे चाकर । आम्ही. ॥ ध्रुवपद. ॥
हरिकीर्तन हा आमुचा मुशारा । रामनाम तुप साखर. ॥ आम्ही० ॥ १ ॥

नाम ब्रह्म पै बिज मुक्तीचें । जामिन चंद्र दिवाकर. ॥ आम्ही० ॥ २ ॥
अमृतरूप घरिं बसल्या देतो । स्वात्मसुखाची भाकर. ॥ आम्ही० ॥ ३ ॥

### पद ७७ वें.

अर्जि तुम्ही ऐका । सखि सहोदर म्हणती पैका. ॥ ध्रुवपद. ॥

पैक्यापासुनियां रथ गाडी । पैका बांधीत असे माडी ।
पैक्यापासुनि शालजोडी ॥
पैका उडवित असे घोडीं । लाउनि सडका. ॥ सखि० ॥ १ ॥

पैक्यापासुनि कन्यापुत्र । पैका मिळवी इष्ट मैत्र ।
पैका महारत्न विचित्र ॥
.................... । संचित टका. ॥ सखि० ॥ २ ॥

पैका माजी एक निधी । जेथें पैका तेथें बुद्धि ।
........................ ॥
ज्याला पैका न मिळे कधीं । तो नित्य फिका. ॥ सखि० ॥ ३ ॥

पैक्यापासुन कामकाज । पैका मिळवी बहुत व्याज ।
पैका मायेचें निज बीज ॥
पैका बहु रत्न महाराज । कागद रोखा. ॥ सखि० ॥ ४ ॥

पैक्यापासुन कारभार । पैका हिंडवी दारोदार ।
पैका दुःखाचा डोंगर ॥
पैका गर्वाचा सागर । बुडवी कटका. ॥ सखि० ॥ ५ ॥

पैक्यापासुन पुराण श्रवण । पैका करी वेद पठण ।
पैका करी नृत्यगायन ॥
पैका करी झुंज भांडण । ............ ॥ सखि० ॥ ६ ॥

पैक्यापासुन व्याही जांवई । पैका देतो म्हैशी गाई ।
पैका दावी अनभ बढाई ॥
..................... । मिळवी बाइका. ॥ सखि० ॥ ७ ॥

ऐसें पैक्याचें आख्यान । ऐका तुम्ही चित्त देऊन ।
पैका पाहून भुलले जन ॥
अमृतेश्वर निर्मळ वचन । लाधला टिका. ॥ सखि० ॥ ८ ॥

## पद ७८ वें.

किति रे! नटसी? । काय यमासि उत्तर देसी? ॥ ध्रुवपद. ॥
संजाप सोडुनि पगडि बनावसी । छांदार छबिला गुलजार दिससी ।
पानें खावुनि मुख रंगविसी ॥
दांत विचकुनि उगाचि खदखद हससी. ॥ काय० ॥ १ ॥
तन मन धन रांडेसि अर्पिसी । संतसाधूंची निंदा करिसी ।
पुराण कीर्तन कधिं न ऐकसी ॥
समज धरीं तूं व्यर्थ गाढवा! फिरसी. ॥ काय० ॥ २ ॥
भर गेल्या मग सहजचि फससी । आपजन परकी होतील तुजसी ।
दूत यमाचे देतिल फांसी ॥
अमृत म्हणे यमासमोर नेतिल तुजसी. ॥ काय० ॥ ३ ॥

## पद ७९ वें.

त्याला कशाला दुशाला मशाला? ॥ ध्रुवपद. ॥
अवस्थात्रयीं त्यागुनी दिननिशाला ।
आत्मसुखें विचरतसे पांचरी दिशाला. ॥ त्याला० ॥ १ ॥
याचना न करी कांहीं पसरि करपशाला ।
सहजस्थिति शयन करी ठेवि कर उशाला. ॥ त्याला० ॥ २ ॥
देह गेह विसर्जुनी सांडिलें आशाला ।
अमृतराय म्हणे काय करिल यम अशाला? ॥ त्याला० ॥ ३ ॥

## पद ८० वें.

हरि मज कसा करिल भवपार? ॥ ध्रुवपद. ॥
तन मन धन विषयावरि वळतें । भजनीं आळस विकार. ॥ हरि० ॥ १ ॥
स्वात्मबुद्धी विचारुनि पाहीं । कोणि न केला उपकार. ॥ हरि० ॥ २ ॥
अमृत म्हणे तुम्ही भजा निरंतर । श्रीधरगुरुचे पाय. ॥ हरि० ॥ ३ ॥

## प्रासंगिक पदें.

### पद ८१ वें.

धन्य भगवंता! दैवीं काय आलें। बाळ माराया पतिनें सांगितलें. ॥ ध्रुवपद. ॥
पूर्वी देवाचें पुजन नाहीं केलें, । कोण्या मातेचें बाळ विघडविलें, ॥
किंवा कोणाचें अन्न उडविलें, । अथवा अंधाशीं कूपिं लोटियेलें. ॥धन्य०॥१॥
नाहीं केला मी साधुसमागम, । नाहीं दिधलें मी ब्राह्मणासीं अन्न, ॥
किंवा कोणाची निंदा होती केली, । गाई ब्राह्मणा छाया नाहीं दिली. ॥धन्य०॥२॥
वाढल्या वृक्षाची वाढ खुंटविली, । किंवा कोणाची बाळहत्या केली, ॥
पूर्वी देवाची पूजा नाहीं केली, । मार्गी पांथस्था वाट खुंटविली. ॥ धन्य० ॥३॥
किंवा खीरीमधिं लवण मीसळीलें, । विप्र जेवितां उपाशी उठविले, ॥
किंवा कोणाचें द्रव्य हरण केलें, । तें हें पातक भोगायास झालें. ॥ धन्य० ॥४॥
हिरण्यकशिपु पुसे कांतेपाशीं, । अजुनि विलंब कां गे! लाविलाशी? ॥
हातीं घेऊनी विषाचा पेला, । बाळ प्रल्हाद हृदयिं आलिंगीला. ॥ धन्य० ॥५॥
प्रथम त्याचा बा! कडेलोट केला, । दुसऱ्यानें अग्नींत ढकलीला, ॥
तिसऱ्यानें हत्तीचे पदीं दिला, । तेंव्हां त्याचा हो! मृत्यु कुठें गेला. ॥ धन्य० ॥ ६ ॥
नारायणनामाचा प्रल्हाद घोष करी, । त्याचा कैवारी रक्षिता सखा हरी, ॥
धावें पावें येऊन गरुडावरी, । अशीं बहू विघ्नें टाळि परोपरी. ॥ धन्य० ॥ ७ ॥
माता म्हणे मी बाळ मारूं कैसा? । धावें पावें गा! येउनि जगदीशा! ॥
धावें पावूनी येऊनी गरुडावरी। अशीं बहु विघ्नें टाळि परोपरी. ॥ धन्य० ॥ ८ ॥
माता म्हणे बाळ धरिलें उदराशीं । तरी तें दुःख सांगुं कोणापाशीं? ॥
बाळ प्रल्हाद वाढतो दिसामाशीं । आतां मला टाकुनी कुठें जाशी?॥ धन्य० ॥ ९ ॥
हिरण्यकशिपू पुसे कांतेपाशीं, । अजुनी विलंब कां गे! लाविलाशी? ॥
भाषण ऐकतां कष्टि झाली चित्तीं । विषाचा पेला घेतला हो! हातीं. ॥धन्य०॥१०॥
हातीं घेऊनियां विषाची वाटी । मग धरियेली त्याची हनुवटी, ॥
विष हो! तें मुखास लावियेलें । लावतां तें अमृत तोंडीं झालें. ॥ धन्य० ॥११॥

### पद ८२ वें.

रामदर्शनासि चला । लाभ हा भला. ॥ ध्रुवपद. ॥
रामजन्म रामनवमि नक्षत्र पुनर्वसु ।
समय मध्यान्ह दिवा अवतार जाहला. ॥ राम० ॥ १ ॥

---

१. हिरण्यकशिपूची स्त्री कयाधू हिनें आपला पुत्र प्रल्हाद यास पतीचे आज्ञेवरून विष पाजिलें त्या प्रसंगाचें वर्णन. २. रामजन्माचा प्रसंग.

दशरथासि दाशरथी पुत्र जन्मला, ।
त्रिभुवनांत जयजयकार जाहला. ॥ राम० ॥ २ ॥
भजकाचे कोटि अन्याय हा क्षमा करी, ।
उद्धरितां महाराज नाहिं भागला. ॥ राम० ॥ ३ ॥
शबरिकबरिबदरिफळें पदरिं घेउनी ।
भावबळें भुलोनियां भक्षुं लागला. ॥ राम० ॥ ४ ॥
महाविष त्र्यंबकासि अमृत लाधला, ।
पार्वतीसि थोर आनंद जाहला. ॥ राम० ॥ ५ ॥

## पद ८३ वें.

राम[1] गोसावी कीं जाहला, । अवघे मिळोनि पाहूं चला. ॥ ध्रुवपद. ॥
काढुनि मोतीयांची आंगी । दिव्य विभूति लावी आंगीं ।
जैसा भव्य पुरातन जोगी । शरयूतीरीं बैसला. ॥ राम० ॥ १ ॥
फेंकुनि दिला बादली चिरा । वाटिला मोतियांचा तुरा ।
फेडुनि पिंवळ्या पीतांबरा । वनीं वल्कलें नेसला. ॥ राम० ॥ २ ॥
आतां होऊनि बेजार । काढी किनखापाची वीजार ।
जैसी जुनी तुटकी पैजार । तैसें राज्य झुगारिलें. ॥ राम० ॥ ३ ॥
धाडुनि लक्ष्मणा सुभटा । चीक आणिला प्रार्थुनि वटा ।
मऊ केशाच्या केल्या जटा । दिव्य तांबड्या धगधगीत. ॥ राम० ॥ ४ ॥
उदास होऊनी सुवर्णनगीं । संनिध सीता बैसली उगी ।
भेटीस नलगे परवानगी । उघडें दर्शन चांगलें. ॥ राम० ॥ ५ ॥
भरतें रामातें विनविलें, । त्यासी पादुका भाग्य दिल्हें, ।
चौदा वर्षें राज्य भलें । करितील आतां पादुका. ॥ राम० ॥ ६ ॥
मर्दुनि रावणा कंटका । स्वधर्म स्थापुनियां नेटका, ।
स्वार्जित राज्याच्या पादुका । पायीं घालिल दिसताहे. ॥ राम० ॥ ७ ॥
येथें बहुत फार कष्टलों । नाना दुःखांहीं वेष्टिलों ।
ब्रह्मानंदांतुनी भ्रष्टलों । होईल लाभ तेथें हो ! ॥ राम० ॥ ८ ॥
ब्राह्मण ब्रह्मनिष्ठ भंवताले । रामदर्शनातें आले ।
भगवच्चर्या करूनि जाले । ब्रह्मानंदीं निमग्न. ॥ राम० ॥ ९ ॥

१. कैकेयीच्या आग्रहावरून दशरथानें रामास वनास धाडिलें तो प्रसंग.

[illegible]ला एकांत । निवळ होताहे वेदांत ।
[illegible]री करूं चला विश्रांत । हा गृहधंदा सोडुनियां. ॥ राम० ॥ १० ॥
रामें सोडुनि दिधला कोप । जटा गुंडाळुनि केला टोप ।
केवळ वैराग्याचें रोप । अक्षय शरीर रामाचें. ॥ राम० ॥ ११ ॥
करुनि पर्णकुटीची मठी । भगवी ध्वजा उभवी गुढी ।
नाहीं चोपदार देवडी । दाही दिशा मोकळ्या. ॥ राम० ॥ १२ ॥
जवळी नाहीं मणि फुटका । तेथें कैंचा जरीपटका ।
हा तव परमार्थ नेटका । विवेकासी आणिला. ॥ राम० ॥ १३ ॥
सेवक अमृतराय भगवान । त्याला अखंड हेंची ध्यान ।
आपले जातीचें महिमान । ज्याला त्याला आवडे. ॥ राम० ॥ १४ ॥

## पद ८४ वें.

[1]राम सखा मज भेटल कै कै । पाठवितों वना एकट पै पै. ॥ ध्रुवपद. ॥
अतिसकुमार कुमार वियोगे । लोटति पळयुग कोटित पै पै. ॥ राम० ॥ १ ॥
भक्तहितास्तव हिंडे वनांतरीं । शबरी अहल्या उद्धरी पै पै. ॥ राम० ॥ २ ॥
सद्गुरु बोले हरुषानंदे । अमृतकवी नाचतसे थै थै. ॥ राम० ॥ ३ ॥

## पद ८५ वें.

[2]केला कीं उपकार । मारुते! ॥ ध्रुवपद. ॥
घेउनियां करीं आणियला गिरि । औषधिंचा संभार. ॥ मारुते० ॥ १ ॥
प्राणदाता तूं सौमित्राचा । मेळविलें यश फार. ॥ मारुते० ॥ २ ॥
राघव मी परि रविवंशाचा । वाढविला बडिवार. ॥ मारुते० ॥ ३ ॥
अमृतप्रभु स्तुति कपिरायाची । करितसे वारंवार. ॥ मारुते० ॥ ४ ॥

## पद ८६ वें.

[3]अतसि[4]कुसुमसम कांति हरीची. ॥ ध्रुवपद. ॥
सूक्ष्म तंतुचि उंच घोंगडी । पदरीं तगटे कोर जरीची. ॥ अतसि० ॥ १ ॥
आठवितां ममताचि गळाली । रुक्मदोरी दोहिं करींची. ॥ अतसि० ॥ २ ॥
अमृत सदोदित चिंतितसे मानें । मूर्ति यशोदेच्या उदरींची. ॥ अतसि० ॥३॥

---

१. रामवियोगामुळें दशरथानें केलेला शोक. २. रामानें मारुतीची केलेली स्तुति. ३. कृष्ण-वर्णन. ४. जवस. ५. सोनें.

### पद ८७ वें.

[1]पदरीं धरोनि हरि आणा गे बाई ! ॥ ध्रुवपद. ॥
शिरीं बांधियेला चिरा[2] । खोंवी मोतियांचा तुरा ।
वरी झळकतो हिरा । अमोलिक दाणा गे ! ॥ पदरीं० ॥ १ ॥
येउनीयां यमुने स्थळीं । खेळतसे चेंडूफळी ।
तो हा हरी वनमाळी । चतुर शहाणा गे ! ॥ पदरीं० ॥ २ ॥
काळिया मर्दिला ज्यानें । उचलिला गिरी त्यानें ।
मुरलीचे नादानें । माझा मोहिला प्राण गे ! ॥ पदरीं० ॥ ३ ॥
मत्स्य कूर्म नानापरी । दशविध रूपें धरी ।
अमृताचा साह्यकारी । सांगतसे खुणा गे ! ॥ पदरीं० ॥ ४ ॥

### पद ८८ वें.

[3]करितो रळी बहुत सये नंदन गे ! तूझा. ॥ ध्रुवपद. ॥
आंवळोनियां कुच धरी । चुंबन मग देत हरी ।
उभा रडे गळां पडे चेंडु दे म्हणे माझा. ॥ करितो० ॥ १ ॥
बळें घरा येत असे । दहींदूध भक्षितसे ।
करी हांस बहु त्रास ठाव नसे दूजा. ॥ करितो० ॥ २ ॥
दीर भावे आणि पती । गांजितात सांगूं किती ।
सासु नळा पिळिति गळा जीव घेति माझा. ॥ करितो० ॥ ३ ॥
ऐसा असे दुष्ट बाई ! । सोसवेना सांगों काई ? ।
अमृतराय सदा गाई भक्तजनकाजा. ॥ करितो० ॥ ४ ॥

### पद ८९ वें.

[4]वेडा तामसा जोगी । देखिला कि माय ? । ॥ ध्रुवपद. ॥
आरक्त लोचन ज्याचे । पिंगट मिशा ॥
मूमिस लोळे दाढी । बावऱ्या जटा ॥
डोईस घालून राख । मोकळ्या जटा ॥
भिकेचे मागुन तुकडे । भोपळ्यांत खाय ॥ वेडा० ॥ १ ॥
खडखड काळे मणके । वोवोनि माळा ॥
येवढे थोरले पेंदे । वेडियाचे गळा ॥

१. कृष्णपराक्रमवर्णन. २. मंदील. ३. गोपीचें गाऱ्हाणें. ४. शंकर जोग्याचें रूप धरून गोकुळांत कृष्णदर्शनास आला असतां कृष्ण यशोदेजवळ त्याचें वर्णन करितो.

जन्मजूग हातांत । विभूतिचा गोळा ॥
अखंड वोढे भांग । गुंगींत राहे. ॥ वेडा० ॥ २ ॥
तिनशें साठ माशाची । गोदडी बरी ॥
वोऊनि शंभर दोरे । काढे कुसरी ॥
परिप्रकारचे बुरे । शोभति गळा ॥
वेड्यानें आणिले कोठून । चोरुन कीं काय? ॥ वेडा० ॥ ३ ॥
उठोनि धरि एक बैल । त्यावरी बसे ॥
वेडा तामसा जोगी । निरंजनीं वसे ॥
त्याच्या पाठी लागलें । सद्भावपिसें ॥
म्हणे मज अमृत दावा । वेडियाचे पाय. ॥ वेडा० ॥ ४ ॥

## पद ९० वें.

[१]अधरिं धरुनि कोणें वाजविला वेणु? ।
चला बाई! जवळी बहुधा चारि हरि नंद धेनु. ॥ ध्रुवपद. ॥
तो गमत पदि रमत कमजा अभिमत फलदा एक खलकदनु ।
विरति निरति आणि वरद वदती शुकसनकादिक पदतळरेणु. ॥ १ ॥
मधुर मधुर गुण आकर्णू यदुकुळहरणू पिशुनव चरणू ।
न गणुनी शेष ठकित आणि चकित मशक मग अमृत म्हणे मी काय वर्णूं॥२॥

## पद ९१ वें.

[२]यशोदेबाई! ऐक पुत्राचीं लक्षणें. ॥ ध्रुवपद. ॥
व्रजांत कोणे एके दिशीं । आला गर्गाचार्य जोसी ।
त्याला दाखवितां कृष्णासी । चिन्हें बोलता झाला. ॥ १ ॥
मध्यें मुख्य यशोदा बाळा । संनिध रोहिणी वेल्हाळा ।
भवता गोपीकांचा पाळा । त्या गोपाळा दाखवी. ॥ २ ॥
याला पदोपदीं आदान । बरवें वाटित जावें दान ।
द्वारीं पुसतांचि नंदानें । त्याला तैसें सांगितलें. ॥ ३ ॥
उखळी दांव्यानेंच खिळावा । बगल्या सर्पानेंच गिळावा ।
किंवा वणव्यामाजि जळावा । ग्रासिल दावाग्नी सगळा. ॥ ४ ॥
ब्राह्मणलातेचें भूषण । हृदयीं श्रीवत्सलांच्छन ।
त्याला म्हणती ब्राह्मणजन । ऐका जनार्दनाचा. ॥ ५ ॥.

१. कृष्णानें वनांत पांवा वाजविला तो प्रसंग. २. गर्गाचार्यांनीं कृष्णाविषयीं भविष्य सांगितलें ते

पांडवराजियाचे मेळीं । काढिल उष्टया पत्रावळी ।
तुमच्या घरचे गुरें वळी । लाज नाहीं निलाजरा. ॥ ६ ॥
करिल दह्यादुधाची चोरी । भोगिल गवळीयांच्या पोरी ।
अवघ्या शिंदळांचा चौधरी । नवाजी आणिल बायका. ॥ ७ ॥
सेवक अमृतराय सर्वदा । ज्याचा शुद्धभाव हा सदा ।
जैशा पुरें भरल्या नद्या । तैसीं विघ्नें वारीती. ॥ ८ ॥

## पद ९२ वें.

घोंगडीचा पांघरणारा रे! ॥ ध्रुवपद. ॥
हुतुतुतु होबळी चेंडु खेळत । पीतवसन बळकट कसणारा रे! ॥ १ ॥
धरुनि राधिकापदर निजकरीं । घेउनि रतिसुख गत पुसणारा रे! ॥ २ ॥
घरोघरीं वेंचुनिया नवनीत । साय दधी दुध घृत खाणारा रे! ॥ ३ ॥
यशोदेपासी गाऱ्हाणें सांगसी । गाही पुरवितो अमृतेश्वरचरणा रे! ॥ ४ ॥

## पद ९३ वें.

माझा निरोप यशोदेसीं । कोणी तरी सांगा हो ! ॥ ध्रुवपद. ॥
कृष्ण तुझा नावडता बाळ । क्षुधित द्वारीं जो गोपाळ ।
त्यावरी होउन पूर्ण कृपाळ । आपुला बाळ म्हणसील कीं? ॥ माझा० ॥ १ ॥
नाहीं मागत तूप साखर । दे मज कोरडीच भाकर ।
तुझा म्हणवितों मी चाकर । कांहीं निकर दाखवूं नको. ॥ माझा० ॥ २ ॥
यशोदा नोहे तुझि तरी माय । शिवों नको म्हणतो बंधुराय ।
कोणी देइल दहिं दुध साय । त्यासीं उपाय काय करूं ? ॥ माझा० ॥ ३ ॥
ऐकुनि हाक यशोदा माय । धांवत आली जैसी गाय ।
सखया! विपरीत वदसी काय ? । रडती धाय मोकलोनी. ॥ माझा० ॥ ४ ॥
सखया ! वाहत्यें तुझीच आण । तूं सुत माझा गुणनिधान ।
तुजवरी उतरुन सांडिन प्राण । अमृतसमान मज वाटे. ॥ माझा० ॥ ५ ॥

## पद ९४ वें.

तुम्हि निशिदिनीं मनीं ध्या गे ! ॥ वन त्यजुनि सकळ सदना जा गे ! ॥ ध्रुवपद. ॥
पाहिलें रूप जसें गे! । तसें मनांत आणुनि मज ध्यां गे! ॥ वन० ॥ १ ॥
सोयरे आप्त सखे गे! । पतिसुतादि भरतिल रागें. ॥ वन० ॥ २ ॥
मत्प्रसाद तुम्हा गे! । ऋषी पुजिति स्तविति अनुरागें. ॥ वन० ॥ ३ ॥
अमृत म्हणे विनवा गे! । जसें लवण जीवनीं मिळवा गे! ॥ वन० ॥ ४ ॥

---

१. कृष्णलीलावर्णन.

### पद ९५ वें.

बाई! कैसें वेड लावीलें । या हरिनें मन मोहीलें. ॥ ध्रुवपद. ॥
वाटे माझा मीच हरी । चतुर्भूज वेणूधारी ।
संसाराचें भान कांहीं नाहिं राहिलें. ॥ या हरिनें० ॥ १ ॥
मधुवनीं सुमनें । आणूं जातां पथानें ।
अनुरूप रूप म्यां पाहीलें. ॥ या हरिनें० ॥ २ ॥
अमृत म्हणे मी नीके । मानुनि सर्व फिके ।
पंचभूत देहा ज्याचे त्याला वाहीलें. ॥ या हरिनें० ॥ ३ ॥

### पद ९६ वें.

[1]तूं चाल राधे! । झडकरि हरिसंनिध ये रतिसुखसुसमाधे! ॥ ध्रुवपद. ॥
तरुनि अब्ध गाधे । तव दर्शन जरि लाधे ।
नृत्य करिल धेनू मध्यें तद्धिधिकिटताधे. ॥ तूं चाल० ॥ १ ॥
वृषभानुकुलनिधे! । शृंगाररतसुधे! ।
तुजविण अति पीडित हे हरि विरह उपाधे. ॥ तूं चाल० ॥ २ ॥
हा योग साधे । तरि काम मन बाधे ।
अमृत शुद्धयोग करिल हरि बुध अनुराधे. ॥ तूं चाल० ॥ ३ ॥

### पद ९७ वें.

[2]नेऊं नको यदुवीर । अक्रूरा! ॥ ध्रुवपद. ॥
नंद यशोमति भाकिति करुणा । बाल्यदशा नाहिं थोर. ॥ अक्रूरा० ॥ १ ॥
कंस दुरात्मा निशिदिनिं जपतो । घातकि कीं निष्ठूर. ॥ अक्रूरा० ॥ २ ॥
गोपी अवघ्या मिळुनी बोलति । करिं येवढा उपकार. ॥ अक्रूरा० ॥ ३ ॥
अक्रूर नाम तुझें जगीं बोलती । परि करणी दिसे क्रूर. ॥ अक्रूरा० ॥ ४ ॥
बैसविले रथीं श्याम मनोहर । तुजवरि मरतिल फार. ॥ अक्रूरा० ॥ ५ ॥
गोपी विरहें व्याकुळ होती । नयनीं झिरपिति नीर. ॥ अक्रूरा० ॥ ६ ॥
अमृतमतीनें पाहुनि अक्रूरा । सप्रेमें बैसे स्थीर. ॥ अक्रूरा० ॥ ७ ॥

### पद ९८ वें.

येई[3] हो! द्वारकेच्या राया! । माझें कल्याण कराया. ॥ ध्रुवपद. ॥
अवधी नसे कांहीं धांवत येई । संकट सिंधु तराया. ॥ माझें० ॥ १ ॥

---

१. कृष्णलीलावर्णन. २. कंसाच्या आज्ञेनें कृष्णास मथुरेस नेण्याकरितां अक्रूर आला असतां गोकुळांतील गोपी त्यास म्हणतात. ३. वस्त्रहरणप्रसंगीं द्रौपदीनें केलेला कृष्णाचा धांवा.

कोठें गुंतलासी? भीमकी भामा। बैसल्या चरण चुराया. ॥ माझें० ॥ २ ॥
कौरव दुर्जन गांजिति मजला। बहिण मी तुझी देवराया! ॥ माझें० ॥ ३ ॥
अमृत म्हणे हा समय असे कीं। संकटसागरीं तराया. ॥ माझें० ॥ ४ ॥

### पद ९९ वें.

[१]श्रीकृष्ण पांडवांचे घरिं ऐशा परि साजे. ॥ ध्रुवपद. ॥
जो कां वैकुंठनिवास। प्रिय परम शिवास।
सौख्यदायक जीवास। पूज्यमान जो देवास।
तो हा धर्माचे सभेस ॥
जोडुन हात भीत भीत मर्जी पाहुनि अर्जी करी फर्जी जैसा गर्जे तो साजे. ॥ १ ॥
मूर्ति सोज्वळ सांवळी। कटितटिवेष्टित पींवळी।
ओंचे खोवोनि आंवळी। तो हा उष्ट्या पत्रावळी।
चोहों भुजिं कवळी ॥
तनू सांवळी पिवळ्या कथिकांच्या ओघळी पांडवगृहीं विराजे तो साजे. ॥ २ ॥
रम्य नाभीसी कमळ। ब्रह्मा तयामध्यें बाळ।
आपण चिन्मात्रें निर्मळ। अमृत नाम हें कोमळ।
तो यदुरायाचा वंश मूळ ॥
पांडवसदनीं विदुरादिकां आर्या द्रोणाचार्या लागे सूर्यापरि साजे तो साजे. ॥३॥

### पद १०० वें.

[२]अरे! मी भीष्म जरीच तरी, श्रीहरि!। धरविन चक्र करीं, श्रीहरि!॥ध्रुवपद.॥
क्षत्रियकुळिंचा सुत शंतनुचा। जन्मलों शुभजठरीं ॥
हरिपदीं जन्मुनि शिवमौळीं वसे। त्या गंगेउदरीं. ॥ श्रीहरि० ॥ १ ॥
सायुध यादव, चक्ररहित तूं। निश्चय करिसि तरी ॥
सांप्रत मजला कळों येईल रे!। ह्या अनुपम समरीं. ॥ श्रीहरि० ॥ २ ॥
पार्थ हें बचडें बाळक अझुनी। दुग्ध दिसे अधरीं ॥
बुजवणियास्तव पशुपक्षी भिती। निर्भयक्षेत्र करी. ॥ श्रीहरि० ॥ ३ ॥
ध्वजरूपी हरी, हय तेही हरी,। सारथी मुख्य हरी ॥
हरिमय रथ हा विजय श्रीहरी। मी यातें प्रहरीं. ॥ श्रीहरि० ॥ ४ ॥
पाहें मी शिष्य भार्गवरामाचा। कोपल्या न उरे उरीं ॥
अमृतवचनीं सत्यप्रतिज्ञा। ऐकिजे रणचतुरीं. ॥ श्रीहरि० ॥ ५ ॥

---

१. कृष्णवर्णन. २. भीष्मप्रतिज्ञेचें भाषण.

### पद १०१ वें.

अंबा या हिमालयाच्या बाला । हासति जगदंबेला. ॥ ध्रुवपद. ॥
वाटे बाईनें धुंडाळूनी । आणियले हे कोठूनी ।
याचें स्वरूप अवलोकुनि । गंहिवर येतो आम्हाला. ॥ अंबा० ॥ १ ॥
पांच तोंडें दिसती याला । व्याघ्रचर्म पांघुरला ।
दुर्गाबाईचे प्रारब्धाला । कोण मध्यस्थी झाला? ॥ अंबा० ॥ २ ॥
बाई आरुढे गजावरी । येथें बैलाची सवारी ।
आणिक दिसतसे भिकारी । काय तातें पाहिला? ॥ अंबा० ॥ ३ ॥
अंबा म्हणे वो! म्हणतां काय । वंदा मम सद्गुरूचे पाय ।
अमृत म्हणे वो! आदिमाय । समजावी त्या भगणीला. ॥ अंबा०॥ ४ ॥

### पद १०२ रें.

[2]ब्रह्मरात मुनी सप्रेमें वंदावा हो! ॥ ध्रुवपद. ॥
अंशुकविरहित शुक विहरत जो । किंशुकवत फुलला हरिभजनीं. ॥ १ ॥
भक्ति विरक्ती पक्षद्वय राघव । उडत फिरत अनुभव चिद्गगनीं. ॥ २ ॥
देवरात शुकनलिके अटकुनि । ऊर्ध्व पंथ करि किरिकिरि वदनीं. ॥ ३ ॥
जनकप्रथित श्रुतिमथित भागवत। कथित मलिनमति उलथित भविंहुनि.॥ ४ ॥
पदवितत तनय अभिमन्युतनय । करि अतिविनय श्रवण समजुनी. ॥ ५ ॥
व्यास हृदयपंजर शुकमाशुक । आशु करित हरि हरि हरि अनुदिनीं. ॥ ६ ॥
पद्मनाभविधिसांप्रदायमत । अमृतोद्गार वदत मृदुवचनीं. ॥ ७ ॥

---

## हिंदुस्थानी पदें.

### पद १०३ रें.

गनपत भावे । हरिकथारंगमो आवे. ॥ ध्रुवपद. ॥
पगसो नाचे मुखसो गावे । चारो करसो भाव बतावे ।
सुर साजिंदे संग बुलावे ॥
लपटा नागबंदसो दुलदुल दोंद हलावे. ॥ हरि० ॥ १ ॥
चुवेकू तुर्की गत सिखलावे । जादा नव दलमो पैठावे ।
अंकुश पाश फर्श चमकावे ॥
लढाई दुष्ट दैतनमो ज्या हर सीख लगावे ॥ हरि० ॥ २ ॥

---

१. निर्धन शिवाशीं लग्न केल्यावरून पार्वतीच्या सख्या तिची निर्भर्त्सना करितात. २. साधुविशेषाचें वर्णन.

संकट दुख जंजाल जलावे । जगमें सत्कीरत उजलावे ।
ब्रह्मानंदी डुली डुलावे ॥
अमृतरायके घर बैठेला संसार चलावे. ॥ हरि० ॥ ३ ॥

पद १०४ थें.

सबसो आदा । मोरेसर साहेब ज्यादा· ॥ ध्रुवपद. ॥
जासें प्रकृतिपुरुष नरमादा । पैदा हुवे कहत तह दादा ।
तीनो लोक करे मर्जादा ॥
आगे दौरे देव तेतीस करोर प्यादा. ॥ मोरेसर० ॥ १ ॥
बिधिहरिहरका भजन बिरादा । उत्पत्ति स्थिति बोझ्या लादा ।
तामो सबसो आप अलादा ॥
यह गति जाने व्यास ध्रुव नारद प्रल्हादा. ॥ मोरेसर० ॥ २ ॥
चुवेपर जडावका है हौदा । चामर छत्र सुनेरी जर्दा ॥
बाचे अठरा पुरान कर्दा ॥
बाटे खैरात रुपये होन मोहरा खुर्दा. ॥ मोरेसर० ॥ ३ ॥
जाने पूरन बिदिया चौदा । देवे मोल लियेबिन सौदा ।
पूरन प्रसाद मुक्तवलीदा ॥
धर्मों हीन हयांत मुक्तवलीदा बाबा आदाम उमदा. ॥ मोरेसर० ॥ ४ ॥
चमके पेशानीपर चांदा । तक्त बनाया सिंदुर बरदा ।
जगमो देवे आशिर्वादा ॥
जावे अमृतराजसों सुफेत कलंदर सादा. ॥ मोरेसर० ॥ ५ ॥

पद १०५ वें.

सब दुनियापालनवाला । हजरत अल्ला. ॥ ध्रुवपद. ॥
शिरपर जटाजूटकी ढाला । उसमे छपी एक है बाला ।
अखियन चंद्रसूरज उजाला ॥
तिजा नयन अगनकी ज्वाला रखनेवाला. ॥ सब० ॥ १ ॥
विषसें कंठ भयो है काला । सोभत गले रुंडकी माला ।
हिर्दे गिरजाकूं संभाला ॥
गनेस नंदन जो गुलाला. ॥ सब० ॥ २ ॥
हातमें डमरू त्रिशूलभाला । मुद्रा अगाधपूर्णकपाला ।
तात सब जगके प्रतिपाला ॥
अंतरध्यान धरत मनमोहन लछुमनबाला. ॥ सब० ॥ ३ ॥

आसन बनारसीमो डारा । चर्चित बमूत गले मृगछाला ।
बर देवेकूं बडे कृपाला ॥
अमृतरायका बारबार उपराला. ॥ सब० ॥ ४ ॥

## पद १०६ वें.

जय शंकरजीकी लीला । पुनित सुशीला. ॥ ध्रुवपद. ॥
बुट्टेदार व्याघ्रांबर पीला । तापर गजचर्मांबर गीला ।
गरलसें गला भयो है नीला । मरकतशीला. ॥ जय० ॥ १ ॥
चुवे बाघ बैल तबेला । दुर्गा अपने साथ कबीला ।
गनेस बालक अजब छबीला । रंगी रंगेला. ॥ जय० ॥ २ ॥
भोलानाथ चित्तसें ढीला । सिसमो गंगा जोत असीला ।
अमृतरायको बडा बशीला । रसिक रसीला. ॥ जय० ॥ ३ ॥

## पद १०७ वें.

शिव सब घटमो । नहि गुप्त है परगटमो. ॥ ध्रुवपद. ॥
व्यापकज्योतिरूप नरनटमो । बिचरत भूतनके खटपटमो ।
तत्वंपद माहामायके तटमो ॥
महापर्वतके सासीबासी बिचरत तनके पटमो. ॥ नहि० ॥ १ ॥
साजत समय भुजंगके तटमो । अजमत जटाजूटके जटमो ।
मेखल लटकत शिवके कटमो ॥
महापर्वत कैलासवासी नृत्य करत लटपटमो. ॥ नहि० ॥ २ ॥
मनमो मस्त अमलके चटमो । बिराजत गले व्याघ्रांबर पटमो ।
डुलता श्रीगंगाके तटमो ॥
अमृतराय शिवशक्तिउपासक हरहरके खटपटमो. ॥ नहि० ॥ ३ ॥

## पद १०८ वें.

अजब खिलोना । जगदंबा माताजीका. ॥ ध्रुवपद. ॥
लुटु लुटु लुटु लुटु । चाल चलनका चलना ।
मंगलमूरत सूरत खूब । सीस हरी गहरी है दूब ।
एकरदन गजबदन सदन सुख दौलत दे कर तुलना ॥ १ ॥
कानमें कुंडल मोतन हार । गले बिच माला चंद्रजोहार ।
नागबंध कंबरकूं सोभे । हातमें डमरु फरश बिराजे ।

पावमे घुंगरू रुमझुम बाजे आया रंगमो साना ॥ २ ॥
लंबा पेट बडा बा फराक । मिसरीके मोदकके खुराक ।
चुवा सुहावे चपल सवारी । जडावके जीननपर वारी ।
कोऊ पूछत तुम कहा जात हो हासत कहत है अमृतरायसे मिलना. ॥३॥

## पद १०९ वें.

तासों भारी । लपटी है प्रीत हमारी. ॥ ध्रुवपद. ॥
साई सरजूतीरबिहारी । मौज करे सरकार्मुकधारी ।
चरनधूलसे बिधिजा तारी ॥
गनिका गजंद्र भवजल पार उतारी. ॥ लपटी० ॥ १ ॥
भई बेरसें मिलन प्यारी । वाकी बांदरपर असवारी ।
बनचर किलकत फौज तयारी ॥
रावन राच्छस जमात सगरी मारी. ॥ लपटी० ॥ २ ॥
छुडवाई भूपाल दुल्हारी । जाय अजुध्या गुन अवतारी ।
सिंघासनपर चढे मुरारी ॥
श्रीगुरुमध्वनाथपर अमृतराय बलहारी. ॥ लपटी० ॥ ३ ॥

## पद ११० वें.

नंदा नंदा । मोहे प्यारा बालमुकुंदा. ॥ ध्रुवपद. ॥
मुरलीवाला वृजवासिंदा । राधाप्रीती वन दावछंदा ।
रास रचे बाला साजिंदा ॥
सबसो न्यारा देव बडा बाजिंदा. ॥ नंदा० ॥ १ ॥
मात जसोमति पूत मुकुंदा । भवसो पार किया मुचकुंदा ।
सो हरि मुनिजनका सुखकंदा ॥
दावें बांधे गोपी देव गोपिनसो शरमिंदा. ॥ नंदा०॥ २ ॥
वोही कंस करेथा निंदा । सोई सहज पछाडा खंदा ।
मारे अगबग केसी कंदा ॥
नाथे कालिया नाग सब नागनमो रिंदा. ॥ नंदा० ॥ ३ ॥
बह्मनसाधुसंतका बंदा । चरणकमलपर मगन मिलिंदा ।
छांड दिया सब घरका धंदा ॥
कीरत गावे निसदिन ध्यावे अमृतराय नवसिंदा. ॥ नंदा० ॥ ४ ॥

### पद १११ वें.

वो नर कहां पावे । निसदिन हरिगुन गावे ॥ ध्रुवपद. ॥
कुच रोटी कुच लंगोटीमा । खुशाल गुजर चलावे ॥ वो नर० ॥ १ ॥
मिन्नत करकर देवे । तो ही पैसा हात न लावे ॥ वो नर० ॥ २ ॥
दो दिनके दुनया मो । बाहवा करकर जावे ॥ वो नर० ॥ ३ ॥
औरत आगे आवे । मायबहेन बराबर भावे ॥ वो नर० ॥ ४ ॥
फिर चली रातभजनकी । भीमा चिद्गंगामो न्हावे ॥ वो नर० ॥ ५ ॥
अमृतरायके नामसुधारस । मन भरपूर पिलावे. ॥ वो नर० ॥ ६ ॥

### पद ११२ वें.

काया नहि तेरी नहि तेरी । मत कर मेरी मेरी. ॥ ध्रुवपद. ॥
नाहावे हांडा पानी गरम । नहि करता कवडीका धरम. ॥ काया० ॥ १ ॥
इस कायेका कोन भरोंसा । आखर जम डारेगा फांसा. ॥ काया० ॥ २ ॥
बांधे टामटीमकी पगडी । चौथे दीन मुंडावे दाढी. ॥ काया० ॥ ३ ॥
खावे घीखिचडीका खुराक । आखर जल कर जावे खाक. ॥ काया० ॥ ४ ॥
चंदन सीस लगावे टीका । आखर रामभजनबिनं फीका. ॥ काया० ॥ ५ ॥
हुवा जानमे गट्टु । राम भजले धीके तट्टु. ॥ काया० ॥ ६ ॥
चावे पान सुपारी लवंगा । गल्लोगल्लि फिरत बेढंगा. ॥ काया० ॥ ७ ॥
बाजे थंड बनाया डगला । उप्पर काल फिरत है बगला. ॥ काया० ॥ ८ ॥
वोढे शाल दुशाला पट्टु । इसमे क्यौं भूलारे खट्टु. ॥ काया० ॥ ९ ॥
न्याहाली पलंगपर सोवे । इसके खातर जान खोवे. ॥ काया० ॥ १० ॥
अमृत कहे सब झूटा धंदा । भजले राम कृष्ण गोविंदा. ॥ काया० ॥ ११ ॥

### पद ११३ वें.

तुम चिरंजीव कल्याण रहो । हरिकथा सुरस पिओ ।
हरिकीर्तनके साथी सज्जन । बहूत बरस जीओ ॥ ध्रुवपद. ॥
सस्ता दाना पानी निर्मल । गंगाजललहरा ।
रंगराग और बागबगीचे । रुपये होन मोहरा. ॥ तुम० ॥ १ ॥
उंचा मंदिर महाल सुनेरी । महाल मुलुख बसती ।
पुत्रपौत्रको सुंदरकामिनी । सगुणगुण आस्ती. ॥ तुम० ॥ २ ॥
अमृतरायके अमृतबचनसें । सदा सुखी रहियो ।
सबळपुष्टि आरोग्य नामसें । आनंदमों रहियो ॥ तुम० ॥ ३ ॥

### पद ११४ वें.

रात सखी सपना हम देखें ।
राम लखमन सिया जनकल्लीरी. ॥ ध्रुवपद. ॥
ये दोउ कुंवर मोहेर मेंढाडे । मैं अपने गृहसें निर्कसीरी ॥
देख रूप चकित भई आली । मानौं अंग भुजंग डसेंरी ॥ रात०॥१॥
सपनो झूंटो सपनो सांचो । यह सपनेकी बात नहींरी ॥
जो सपनेकी सांची नामानें । मेंहदी मोरे हात रचीरी ॥ रात० ॥ २ ॥
मोर मुगुट मकरायत कुंडल । भाल तिलक गले तुलसीरी ॥
रावण मारे असुर संहारे । तेतिस कोट देवनकी कोट खुलीरी ॥रात०॥३॥
रंग भुवनमें रची रसोई । ओट करी पीतांबरकीरी ॥
वाछव आज कहां लगबरनों । अमृत बूंद घटा बरसीरी ॥ रात० ॥ ४ ॥

### पद ११५ वें.

बजाई कान्ह बौंसी मधुर धून ।
जमुनातटाक तान गुं गुं गुं. ॥ ध्रुवपद. ॥
श्रवन करत चलित जसब ग्वालनी ।
पायल बाजत नाद छुं छुं छुं. ॥ १ ॥
पशुपंखी जलथल सकल तल्लीन भयें ।
मोर करे सोर तामें कोकीलाकी कुं कुं कुं. ॥ २ ॥
जम रह्यो नाद ब्रह्म सम भयो वेद ब्रह्म ।
अमृतकी झर लागी रुं झुं झुं. ॥ ३ ॥

### पद ११६ वें.

करकमलसों चरनकमल लिये ।
आननकमलमों रसना सोकर मी लाप ॥ ध्रुवपद. ॥
जीत कमल और सज्जन जो रसनीं तहिलेत ।
मोरस गोरस सेवन करीत आप ॥ १ ॥
वट विपट नंदराय कर पुटपत्रशयन ।
जय बाल मुकुंद जगत कारन कलाप ॥ २ ॥
ब्रह्म सनातनसे येहि येही ब्रजको कल्यान ।
अमृतराय येमन कर अलाप ॥ ३ ॥

---

१. सीता. २. लाडकी. ३. घरांत बैठकीची जागा. ४. निघाली. ५. सखो.

### पद ११७ वें.

अब तो भली बनी । हर लिनी मुरली हरकर किं हूं सरकी ॥ ध्रुवपद. ॥
और सखि दौर गई सुमीरनसों लपट लपट ।
छीन लई लकुटी और कलगि सिरपरकी ॥ अब तो ०॥ १ ॥
पीत बसन छीन लियो कामिनको भेख दियो ।
अयन बयन सरस बनी नंदजिकी लरकी ॥ अब तो० ॥ २ ॥
भवसों जब मन उदास तब भयो यह बिभास ।
अमृतराय निरखत है ये छब गिरधरकी ॥ अब तो० ॥ ३ ॥

---

## अमृतरायकृत आणखी उपलब्ध पदें.

### पद ११८ वें.

गोविंद गाय तो नंद यशोमतिचा. ॥ ध्रुवपद. ॥
मोहो हाला[1] पिउनि तूं महालांत ।
हालामध्यें हा लाभ मम कैंचा ? ॥ गोविंद० ॥ १ ॥
वंशी[2] वाजवी गोप वंशी जन्मोनि ।
जीव अंशीं मेळवि वंशीचा ॥ गोविंद० ॥ २ ॥
केशीं धरूनि मारि केशीय करि ।
राधिकेशीं प्रसंग रतिचा[3] ॥ गोविंद० ॥ ३ ॥
गाई चारितां करि धाई मुलासि ।
पाई चाले सासुरा रतिचा ॥ गोविंद० ॥ ४ ॥
दांवीं बांधितां रूप दावी मातेशी ।
तो गोंसावी अमृतकविचा ॥ गोविंद० ॥ ५ ॥

### पद ११९ वें.

हरि ! चालवेना माझे चरण दुखती पाई खडे खुपती ।
ये त्वरें करुनि घे कडे चालवेना ॥ ध्रुवपद. ॥
देव म्हणे बैसें खांदे खांदिं केविं बैसों जातां ।
गुप्त करुनी अतितृप्त अमृत रासरंग[4] सुविचार चालवेना. ॥ १ ॥

१. विषा २. पांवा ३. सुरताचा, निधुवनाचा. ४. रासक्रीडा.

## पद १२० वें.

तूं रत हरिगाणीं । पाहतां दो दिवसांची जिंदगाणी. ॥ ध्रुवपद. ॥
कितिरे कारभार करिशी । ........................ ॥
नैश्वर्य लोकीं भूषण मानुनी । पंचभुतांची तनुवि गाणी ॥तूं रत०॥१॥
किती रे ! मेळविशी पैसा । पराधीन होऊनियां कैसा ।
वेश्या शरीर वोढवुनी । साधी जेंवी दुगाणी ॥ तूं रत० ॥ २ ॥
ज्या देहीं वैकुंठ ध्यावें । त्या देहा कैलासा जावें ।
तें वेचुनियां आठां प्रहरां । लाभ नव राग गाणी ॥ तूं रत० ॥ ३ ॥
आर्जवुनियां राजद्वारें । किती रे करिशी घरेंदारें ।
चोरें तें गौरविली पोरें । सोनें जडित नगांनीं. ॥ तूं रत० ॥ ४ ॥
अमृतराय तूं बसुनी हरिशी भज । दुर्लभ नरतनु सांपडली तुज ।
राज उकरडा वृथा उकरिजे । खरकुकड्यादि खगांनीं. ॥ तूं रत०॥५॥

## पद १२१ वें.

संपत्तीच्या बळें रे । करसी नाना चाळे रे ।
स्वस्त्री त्यागुनि परस्त्रियेचे संगती लोळसी रे ॥ ध्रुवपद. ॥
मदगर्वाच्या बळें रे । धुरें भरले डोळे रे ।
हरिकीर्तनीं आळस मोठा चौपट बाजी खेळें रे ॥ संपत्तीच्या० ॥ १ ॥
संतबुद्धीचा विटाळ रे । कुबुद्धि ऐकें प्रबळ रे ।
संतसज्जनां त्यजुन प्राण्या निंदकाच्या जवळ रे ॥ संपत्तीच्या० ॥ २ ॥
अमृतस्वामी भोळा रे । विनवी साधू सकळां रे ।
राजहंसाचा मळा रे वायसाचा चाळा रे ॥ संपत्तीच्या० ॥ ३ ॥

## पद १२२ वें.

चल जाऊं विदुराघरीं । उद्धवा! ॥ ध्रुवपद. ॥
उंच उंच माड्या नाहीं कामाच्या । साधुची झोंपडी बरी ॥ उद्धवा०॥१॥
लाडू अनारसे नाहीं कामाचे । भावाची आंबील बरी ॥ उद्धवा० ॥ २ ॥
शाल दुशाले नाहीं कामाचे । साधूची गोधडी बरी ॥ उद्धवा० ॥ ३ ॥
अमृत म्हणे कीं हीच विनंती । सोडूं नये कदापि हरी. ॥ उद्धवा० ॥४॥

## पद १२३ वें.

येई येई वो श्रीरंगे ! माझे अंतररंगे करुणाकल्लोळे ! ।
निज सखये निष्ठुर झालिस कां! वो! ॥ ध्रुवपद. ॥

---

१. पृथ्वी, आप, तेज इत्यादिकांची. २. वायस=कावळा. ३. भक्तिभावाची. ४. लहरी.

रविशशिविण जैशी दिनरजनी शोभा न पवे ।
मायेवांचुनि घनबिंदु क्षिरसिंधु टाकुनि चातक जाये ।
मीना जवळ नाहीं तरि पाही दधिमधू सेविल काये ।
तैसें तुजविण वो सखये! उपाय ते अपाये ॥ येई येई० ॥ १ ॥
कंठीं कृष्णमणी न विराजे, कुंकुम न वसे भाळीं ।
त्याविण वधू सर्व शृंगारा लेवुनि काय जाळी? ।
तैसे तुजविण वो निजसखये! विधिनें लिहिलें भाळीं ।
मंगळदायक ते अतिहरुषे मिरवी जैशी बाळी. ॥ येई येई० ॥ २ ॥
करुणा परिसोनि चिद्गगनीं बोले अमृत शब्द ।
सखया सावध रे! सावध रे! कां करिसी हा खेद ।
सत्ता एक जगीं विलसतसे तुज मज कैंचा भेद ।
शोक भंगला रंगला अवघा निजानंद. ॥ येई येई० ॥ ३ ॥

### पद १२४ वें.

हकनाक आयुष्य जाय प्राण्या! उगाची बससी काय? ॥ध्रुवपद.॥
मनासि मानलें तें तूं करिशि देवासी जें का न साय ।
विचार बोलुनि अवघा करिसी कृत्रिम हा व्यवसाय ॥ हकनाक० ॥१॥
अतिप्रीतीनें देहा पाळिसी भिक्षुक देति दुहाय ।
भोग भोगितां रोग उठति तुज रक्तपित्त कफवाय ॥ हकनाक० ॥ २ ॥
स्वदारा हो परदारा हो भुलणें हाचि अपाय ।
अनुतापाविण नरकीं पडसी मग हा न चले उपाय ॥ हकनाक० ॥३॥
अनादि ईश्वर सत्य अमृत हें म्हणोनि सद्गुरु माय ।
मलाहि दिसतो तुम्हां सांगतों पुढील तरणोपाय ॥ हकनाक० ॥ ४ ॥

### पद १२५ वें.

गेला हरी रुसुन यमुनेतिरीं । आतां तो येइल कसा? ॥ ध्रुवपद. ॥
राधे! तुजला किति शिकवावें । मोहुनि केला पिसा ॥ गेला० ॥ १ ॥
जेंवि जळाविण तळमळि मासा । हा जिव झाला तसा ॥ गेला० ॥ २ ॥
श्याममनोहर प्रार्थुनि आणा । सांगुनि आपुली दशा ॥ गेला० ॥ ३ ॥
रतिसौख्यानें अधरामृतपानें । लुटपुट झाला तसा ॥ गेला० ॥ ४ ॥

### पद १२६ वें.

मारुते! राम कुठें मज सांग ॥ ध्रुवपद. ॥
मृगहरणास्तव प्रभु पाठिवले । कशी मी पियालें भांग ॥ मारुते० ॥ १ ॥

रावण मेला उलथुनि गेला । नाहिं राहिलें देहभान. ॥ मारुते० ॥ २ ॥
कुशब्द बोलुनि शेषा छळिलें । नेइल मज गाईसमान. ॥ मारुते० ॥ ३ ॥
अमृता प्रभु तो भेटेल केव्हां । नेइल मज निजधाम. ॥ मारुते० ॥ ४ ॥

### पद १२७ वें.

देइल भेटि तुला । तरिच हरि. ॥ ध्रुवपद. ॥
व्रजयुवतींसम तन्मय होसि । सांडुनि जाती कुळा. ॥ तरिच० ॥ १ ॥
गजपति ऐसा त्यक्त कुटुंबें । अर्पिसि कंज फुला. ॥ तरिच० ॥ २ ॥
प्रऱ्हादापरि सर्वा भूतीं । पाहसि नरहरिला. ॥ तरिच० ॥ ३ ॥
अमृत म्हणे ध्रुव द्रौपदीसारिखा । केवळ होसि भला. ॥ तरिच० ॥ ४ ॥

### पद १२८ वें.

पाय तुझे गुरुराया । भवसागर पार कराया. ॥ ध्रुवपद. ॥
तुजविण भजन पुजन आणि साधन । व्यर्थ शिणावें वायां. ॥ पाय० ॥ १ ॥
भागिरथी सरयू आणि गोदा । काशि अयोध्या माया. ॥ पाय० ॥ २ ॥
अमृतेश्वर सर्वेश्वर ईश्वर । करी अजरामर काया. ॥ पाय० ॥ ३ ॥

### पद १२९ वें.

संत उदार कसे ? । पहा पहा. ॥ ध्रुवपद. ॥
दर्शनमात्रें पावन करिती । परिसीं लोहे[2] जसें. ॥ पहा पहा० ॥ १ ॥
ज्ञानपण हें सांडुनि सगळें । दहिं कर्पूर जसे. ॥ पहा पहा० ॥ २ ॥
चरणामृत हें पाजुनि दासा । लाविति ज्ञानदशे. ॥ पहा पहा० ॥ ३ ॥
बंदी माधवा अमृतचरणीं । देती ज्ञान जसें. ॥ पहा पहा० ॥ ४ ॥

### पद १३० वें.

सच्चित्सुख आत्माराम गावा हो ! ॥ ध्रुवपद. ॥
अमलकमलसम यमल[3]चरणिं मन ।
रमेल तरीच भव समल शमलों हो ! ॥ सच्चित्सुख० ॥ १ ॥
विदुषमान्य शरधनुष धरण ।
कलिकलुषहरण येक निमिष भरण हो ! ॥ सच्चित्सुख० ॥ २ ॥
गीता उपदेशी भयभीता ।
पीतांबरधर सीतानाहो[4]. ॥ सच्चित्सुख० ॥ ३ ॥

---

१. लक्ष्मणा. (लक्ष्मण हा शेषाचा अवतार होय.) २. लोखंड. ३. दोन. ४. पति.

लक्ष्मणसहित सुलक्षण क्षणभरि ।
अमृत म्हणे गुणगण ऐका हो ! ॥ सच्चित्सुख० ॥ ४ ॥

पद १३१ वें.

मींचि वो हरि वो वो जाण. ॥ ध्रुवपद. ॥
उद्धव मुखें हरि ज्ञानदेव बरवें ।
अमृतसें श्रुति सार हरि वो वो जाण ॥ मींचि वो० ॥ १ ॥

## सुदामचरित्र. (हिंदुस्थानी.)

(साकीवृत्त.)

भूक लगी तव हरिहरि जपना बलसें भूकहि खावे ।
सहनसीलता कहा बखानो अतिसंतोख दिखावे ॥ १ ॥
तर्कशास्त्र मीमांसा नाटक सब व्याकरण पढावे ।
आप सदा बे वांत बिचारे प्राणायाम चढावे ॥ २ ॥
गरीब मेरी तरुन कोमिनी पतिव्रता की माता ।
अधो दृष्टिसें उपर देखना नयननमों न समाता ॥ ३ ॥
देवेगा धन अपार तुमको देखतही गुरु बंधु ।
पास द्वारकानाथ बिराजत रतनाकर जलसिंधु ॥ ४ ॥
चैल खंड चौगून धरी मो छोटी गठडी पोहे ।
लिये चले द्वारका पथमो सुखमो नाम जपो हें ॥ ५ ॥
कैसो दरसन होवे मुजकूं वो राजनको राजा ।
द्वारावती देखे नयनसों बाजे नौबेत बाजा ॥ ६ ॥
कूद परे मंचकसौ दौरे जो रुक्मिनि सों रूठे ।
चरनकमलपर सीस धरे उठ ऊठ कहे नहिं ऊठे ॥ ७ ॥
मैलोगिरि चंदनकी चौकी ऊपर पांव धरावे ।
दीर्घ दंड सम प्रनाम पहिले सबही सोंकर वावे ॥ ८ ॥
मलिनचरनतल रेख मृत्तिका कोमल करसों पकरी ।
पाव दबावत जानु जंघ निर्मास बांस कील करी ॥ ९ ॥
ग्रंथि मुक्तकर एक मुष्टिभर मुखमें डारत चुडवे ।
अमृत फिका तहा कोन गनेहै खडरस सबही कडवे ॥ १० ॥

---

१. वाद्यविशेष. (हा शब्द आरबी आहे.) २. बायको. ३. ही पश्चिम समुद्रामध्यें गुजराथें[illegible] आहे. ४. मैलागिरी-(मलयपर्वत) हा सह्याद्रि पर्वताचा एक भाग आहे. येथें चंदन. उंचप्रतीच[illegible] होतो. ५. चौकी-खुरची.

## अमृतरायकृत नवीन उपलब्ध झालेलीं पदें.

### पद १३२ वें.

स्मरतां नित्य हरी । मग ते माया काय करी ॥ ध्रुवपद. ॥
श्रवणें मननें अद्वय वचनें । पळतो काळ दुरी ॥ मग ते० ॥ १ ॥
करुणाकर वरदायक हरि जो। ठेवित हात शिरीं ॥ मग ते० ॥ २ ॥
तोचि[1] निरंतर उद्धवचरणीं । अमृत पान करी ॥ मग ते० ॥ ३ ॥

### प्रभाती[3].

### पद १ लें.

तूं ये मोरया । लुटुलुटुलुटुलुटु तर कर । सुंदर वर द्याया ॥ ध्रुवपद.॥
एकदंत दयावंत । शूर्पकर्ण संमत ।
सिंदुरवर लंबोदर । अति अमोघ कांया[4] ॥ तूं ये मोरया० ॥ १ ॥
पीतांबर नूपुरवर[5] । घुळघुळ घागरिया ।
त्रिग त्रिग थै नृत्यप्रिय । उभय भागिं जाया[6] ॥ तूं ये मोरया० ॥ २ ॥
निशिदिनिं करि अमृत मनीं । घोष नामीं भाव धरुनी ।
करणीवरणी गुण सकल, दोष विघ्न जाया ॥ तूं ये मोरया० ॥ ३ ॥

### पद २ रें.

तूं जाग[7] भैय्या ! । त्यज त्यज त्यज निद्राभर । जोगी चित्त पैया ॥ ध्रुवपद॥
गैंया[8] सब ठाडि[9] रही । कांसनसे दुग्ध स्रवत ।
बच्छनको[10] तलमलाट । पीवनकी[11] बिरियाँ[12] ॥ तूं जाग भैय्या० ॥ १ ॥
ग्वालबाल चेत[13] भये । मंथनकी बिरिया ।
गुं गुं गुं शब्द करत । नवनीत खैया ॥ तूं जाग भैय्या० ॥ २ ॥
बिनति सुनत चेत भये । मूख पेखलैया ।
केशरके तिलक बीच । मृगमदकी[14] बिंदियाँ[15] ॥ तूं जाग भैय्या० ॥ ३ ॥
आगे आगे आप चलत । पीच्छे चलत है गैया ।
अमृतराय निरखत है । ये छबि[16] अजबैया[17] ॥ तूं जाग भैय्या० ॥ ४ ॥

---

१. 'शिष्य' असा अन्य पाठ आहे. २. हें पद विठ्ठलकृत असें 'नवनीतां'त म्हटलें आहे, परंतु हें अमृतरायाचें असावें असें वाटतें. ३. प्रभातकाळीं म्हणण्याचीं पदें. ४. शरीर. ५. पैंजण. ६. बायका. ७. जागा हो. ८. गाय. ९. उभी. १०. वांसरूं. ११. पिण्याची. १२. वेळ. १३. जागे झाले. १४. कस्तुरीचा. १५. बिंदु, टिपका. १६. कांति. १७. आश्चर्यकारक.

थैक था, नवरस भक्ती थैक थैक था, दश बिदेह थैक थैक था, रुद्र एकादश थैक थैक था, बारा मितर थैक थैक था, सब के पितर थैक थैक था, बेद लोक बिधि थैक थैक था, गिरी बैकुंठा थैक थैक था, ध्रुव अढळपद थैक थैक था, गोरी राधा थैक थैक था, थै थै थै थै देवें गिरकी, गुंडाळ भिरकी, बऱ्हाणपुरकी, वा भयी वा बस खुब घटा जद, शीव जटासो गंगा झिरकी, ऋषि मुनि सब थिरका थिरकी, होय रही तब, बजा अचुक दुंदुभी अवाजा, नाच रहे त्रिभुवनके राजा, विमान आयीं सुर की भाजा, पंचारत करिती यदुराजा, महा सती कोइ पाच पचीसा, उसमे है दो मुख्य मुख्य वो अरुंधती अनसूया. ॥ ब्रजमो० ॥ ४

सत पैंताल धुंनक उठी हैं, नागनशिरसो धरा छुटी हैं, हरकी माया नही झुटी हैं, नाच रहे अहि, मजा लुटी हैं, कोउ नहीं सावध, गाफल हो रहे हैं, शेष वासुकी गाफल हो रहे हैं, तक्षक धोंडे गाफल हो रहे हैं, कवडे धामन गाफल हो रहे हैं, तिडके बहरे गाफल हो रहे हैं, गुहो अंगारे गाफल हो रहे हैं, लहरे काले गाफल हो रहे हैं, शंखे डवरे गाफल हो रहे हैं, पीरे भवरे गाफल हो रहे हैं, डंके छितडे गाफल हो रहे हैं, फनके मनके गाफल हो रहे हैं, कार कोट कबी नहि भान, तिन ताल एकबिस सर्ग भुवन कों चौदा सतही नाच रहे हैं, लख छूट भये जद देखे कान्हा, लोट पोट सब तब बन्सी वो रखी ओंट सो, खडे रहे जद भयी हुशारी, ग्वालबाल गोकुलकी नारी, मात जसोदा कहे बलहारी, मेरो कँहा है, नहिं मालुम वो कुंजबिहारी, सब देवन का देव करारी, जगजीवन लीला अवतारी, मधुसूदन सुजन उद्धारी, सब असुर सब मार पछारी, संत भगतकी माया हारी, सो बनवारी, उठा लिया, तनसो लपटाया, चली गवालन गृह मंदिरमो, मेरो बछडो अरे किसन, तै ऐसी कहे, दधि भात उतारे, कोट रुपया मुखपर वारे, जब त्रिभुवनमो बजे नगारे, धन्य जीव गोकुलके सारे, झाड फत्तर पशु पछी तारे, कहे अमृत सिरताज हमारे, भजो चरण, सुख ध्यान धरो, सब मीटे दुःख, मुख नाम स्मरो, येही बिनती मानो हमारी, सब जग मेरे भय्या. ॥ ब्रजमो० ॥ ५

---

१. 'धाता मित्रोऽर्यमा रुद्रो वरुणः सूर्य एव च । भगो विवस्वान् पूषा च सविता दशमः स्मृतः ॥ एकादशस्तथा त्वेष्टा विष्णुर्द्वादश उच्यते ॥' २. ध्वनि. ३. अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल, पाताल हे सप्तपाताल होत. ४. ध्वनि. ५. शेष. ६. पृथ्वी. ७. कोठें. ८. ठरीव. ९. विष्णु. १०. ओंवाळी.

## वेदांत.

(कटिबंध.)

ध्यावोनि निजरुप सुखातें, अज अव्यय अद्वयातें, सर्वात्मक सर्वगुणातें, सर्वात्मा सर्वेशातें. ॥ ध्रुवपद. ॥

निर्गुण निर्विकार निरामय, निश्चळ निर्मळ पूर्ण सुखालय, नित्यानंद निवांत निरंजन, नित्य सदोदित निजरूपात्मक, निरहंकार निरभिमानी, निज गुज निज परिवार रहित जो, निर्विकार सनातन सद्गुरू, सर्वसाक्षी सर्वांतरव्यापक, सर्व जनांतें चेष्टविता, मग नष्टविता, कर्ता हर्ता जग आठविता, मग सांठविता आपणा उदरीं, नदरी नभरी न घरीच धरी, हृदयाभीतरी, वरि मौन्य धरी, मग निज करीं, वटपत्रि जरी, लय पूर्ण करी, लघुरूप धरी, आठव नाठव सर्व हरी, मुखीं बाळरूपें अंगुष्ठ धरी, द्वितियासि नसे मग ठाव जरी, आपण ब्रह्म सगुण सनातन, मायातीत अविनाश पुरातन, सर्व जगाचें आदिमूळ जो, ब्रह्म कल्पिचें पूर्ण बीज जो, ध्या तुम्ही त्यातें, निज स्वरुपातें, ब्रह्म रुपातें, चित्स्वरुपातें, अगुण गुणातें, आठवि निज अंतरिं परम पदातें. ॥ ध्यावोनि० ॥ १

अहंब्रह्म ब्रह्मास्मि त्वंपद तत्पद असी पदांतें आठवीं, नाठवि दृश्य पदातें, नुरवि चैतन्यात्मक चिन्मय चिद्घन, सच्चिदानंदातें उभवी, अकार, उकार, मकार, मिरवी, अर्धरुपें तन्मात्रा पुरवी, स्थूळ सूक्ष्म कारण करवी, महाकारणावस्था पुरवी, जागृति स्वप्न सुषुप्तिसि बरवी, तुर्या ही त्यावरती झडवी, रंग चार त्यावरते रिझवी, रक्त श्वेत शामातें बुजवी, नीळ पीत वरता तो सजवी, वरती माया सत्ता उरवी, अहं ब्रह्म मी, हें कर्ता मी, या जाणें मी, चेष्टवि या मी, पाळुनियां संहार करी मी, ऐशा रितीनें दावुनि लीला, ब्रह्म भावें शून्यचि झाला, त्या स्वरुपातें, श्रीगुरुनाथें, करुनि कृपातें, अनुभवि मातें, अमृतनाथें, अमळ पदातें, धरुनि निज हृदयीं त्यातें. ॥ ध्यावोनि० ॥ २

---

## संसारदुःखवर्णन.

(कटिबंध.)

हा प्राणी व्यर्थ जन्मला, जन्मोनी वायां गेला. ॥ ध्रुवपद. ॥

आदौ जननीजठरिं जाचणी, नवमासानें पूर्ण भरोनी, फार दुःख तें गर्भ-

---

१. जन्मरहित. २. विकाररहित. ३. उत्पन्नकर्ता. ४. हें वर्णन श्रीशंकराचार्यकृत संस्कृत चरपटपंजरीचें भाषांतर आहे.

लागुनि, मळमूत्रामधें रुधिर तिंबला, परम गांजिला, श्रीहरिचरणीं दृढतर झाला, 'सोऽहं' 'सोऽहं' जपूं लागला, माये विटला, कष्ट सोसिले, दुर्गंधीनें चित्त वीटलें, त्वचा बांधुनी शरिर वेष्टिलें, उपाय तेथें कांहीं न चाले, पूर्व संचितें अकस्मात तो बाहेर आला, प्रपंचवारा लागे शरीरा, 'कोऽहं' 'कोऽहं' करूं लागला, चित्त स्वरुपासी दूर टाकिला, त्या बाळाला तेल माखुनी, न्हाउनी धुवुनी, निर्मल करुनी, वडिल ऐकुनी, लगबग लगबग येती धांवुनी, आम्हासी पुत्र झाला, उपमा नाहीं त्या पुरुषाला, सुलक्षणी हें बाळ भासतें, सामुद्रिक सुचिन्ह दीसतें, प्राप्त झाला वडिल सुकृतें, पंचम वर्षी खटपट करुनी, वेदांती सिद्धांती आणुनी, दशमी द्वादशी मुहूर्त करुनी, व्रतबंधासी निश्चय करुनी, कार्यासी संसर्गासि बोलाउनी, व्याजासहित द्रव्य घेउनी साहित्यासी लागला. ॥ हा प्राणी० ॥ १

विचार पाहतां बाळपणींचा ·············· गुंतला. ॥ हा प्राणी० ॥ २

वृद्धपणींची थोर अवस्था ···················· रंगला. ॥ हा प्राणी० ॥ ३

## पदसंग्रह.

### पद १ लें.

देखिला हनुमान् । म्यां हो ! ॥ ध्रुवपद. ॥

रामपदांबुजिं मस्तक ठेउनि । नम्र करुनि हनुमान् ॥ म्यां हो० ॥ १ ॥

पाहुनि रूप सुखार्थ मी झालों । नाहीं राहिलें अनुमान ॥ म्यां हो० ॥ २ ॥

अमृत म्हणे मी तल्लीन झालों । त्यजुनियां अभिमान ॥ म्यां हो० ॥ ३ ॥

### पद २ रें.

कानुड्यानें माझें मन मोहिलें. ॥ ध्रुवपद. ॥

व्रजवनिं सुमनें आणावया गेलों । ················ ॥

अवचित अनुपम रूप पाहिलें ॥ कानुड्यानें० ॥ १ ॥

वाटे माझा तोचि हरी । चतुर्भुज वेणुधारी ॥

संसाराचें भान कांहीं नाहीं राहिलें ॥ कानुड्यानें० ॥ २ ॥

---

१. माया. २. 'पाहुनि' असाही पाठ आहे. ३. 'वित्त' असाही पाठ आहे. ४. हीं कडवीं पूर्वीच पृष्ठ ७२ येथें छापिलीं आहेत. ५. 'न राहिलें देहभान' असाही पाठ आहे. ६. कृष्णानें. ७. पुष्पें. ८. 'मिचि' असा अन्य पाठ आहे.

अमृतफळ हें पिके । सर्व हरी हेंचि निकें ॥
चंचल चित्त ज्याचें त्यासि वाहिलें ॥ कानुड्यानें० ॥ ३ ॥

### पद ३ रें.

तेयांचे शब्द मनीं रुतले. ॥ ध्रुवपद. ॥
सुत धन दारा गृह ही त्यजिलें, । भगवंतीं रतले ॥ तयांचे० ॥ १ ॥
हरिगुण गातां, प्रेमजळानें । सर्वांगीं धुतले ॥ तयांचे० ॥ २ ॥
सुखोद्गार ते ब्रह्मरसाचे । अमृत म्हणे सांचले ॥ तयांचे० ॥ ३ ॥

### पद ४ थें.

कैलास चारी । 'शिव शिव' उच्चारी ॥ ध्रुवपद. ॥
नंदीवरती करुनी स्वारी । गंगामनकर्णिकातीरविहारी रे! ॥ कैला० ॥ १ ॥
अर्धनारी नटावतारी । सत्य ज्ञानानंत विकारी रे! ॥ कैला० ॥ २ ॥
अमृतेश्वर हा सुरसाहाकारी । काशी विश्वेश्वर मृड हर त्रिपुरारी रे! ॥ कैला० ॥ ३

### पद ५ वें.

अशांतही न चुकेल आत्मसमाधी ॥ ध्रुवपद. ॥
गृहसंबंध तमोगुण यांची । कर कर नित्य उपाधी ॥ अशां० ॥ १ ॥
सुतदारादि मनोगत रक्षण । तेल मिठाची आधी ॥ अशां० ॥ २ ॥
अमृत म्हणे असे साम्याचें बळ । बोध जयासि अगाधी ॥ अशां० ॥ ३ ॥

### पद ६ वें.

वद रे! रे! राम सुवाचे ॥ ध्रुवपद. ॥
विष विषयाप्रति पीयूष मानुनि । सेउनि कोण न वांचे ॥ वद० ॥ १ ॥

१. साधुसंतांचे. २. शिवाची प्रतिमा अर्धस्त्री आणि अर्धपुरुष अशी असून तिची पूजा कित्येक ठिकाणीं करतात. या आकृतीवरून त्याला अर्धनारीश, अर्धनारीश्वर, अर्धनारीनटेश्वर, असें नांव आहे. या मूर्तींत दक्षिणार्धीं शिव आणि वामार्धीं पार्वती अशी योजना असते. याचा विग्रह:—'अर्धं नार्या अर्धनारी सा ईश्वरा यस्य सोऽर्धनारीश्वरः' अनर्घराघव—रुचिपत्युपाध्यायकृत टीका—पृष्ठ २७२, काव्यमाला. सोलापुर जिल्ह्यांत शिवाची अशी अर्धनारीनटेश्वर मूर्ति ज्यांत आहे असें एक मंदिर आहे. अशा रूपाविषयींचा उल्लेख संस्कृत ग्रंथांत अनेक स्थळीं आढळतो. कुमारसंभव—सर्ग १ श्लोक ५०; अनर्घराघव—अंक ७ श्लोक ३६; कीर्तिकौमुदी—सर्ग १ श्लोक ३; मालविकाग्निमित्र—अंक १ श्लोक १; स्तुतिकुसुमांजलि—स्तोत्र २१ वें पहा.] ३. अमृत.

रामनामामृत पूर्ण मनोरथ । पुरले सांब शिवाचे ॥ वद० ॥ २ ॥
अमृतप्रभु हा स्मरतां चिंतितां । तुटतिल पाश भवाचे ॥ वद० ॥ ३ ॥

### पद ७ वें.

तयाचें चालवणार हरी ॥ ध्रुवपद. ॥
भागवतश्रवणाची निष्ठा । निश्चळ अचळ धरी ॥ तयांचें० ॥ १ ॥
प्रातःस्नान निरंतर संध्या- । वंदन जोहि करी ॥ तयांचें० ॥ २ ॥
निद्रालु आळसि संसारीं । न कळे काय घरीं ॥ तयांचें० ॥ ३ ॥
नसतां देत अकल्पितसमयीं । परम अमृतलहरी ॥ तयांचें० ॥ ४ ॥

### पद ८ वें.

तो हरि अवतारी अवतारी । मायाव्यसन विस्तारी ॥ ध्रुवपद. ॥
त्रिजगची तारी कांसे लावुनि उतारी. ॥ तो हरि० ॥ १ ॥
ब्रह्मांडचि तारी ज्याची अमृत तुतारी. ॥ तो हरि० ॥ २ ॥

### पद ९ वें.

राम राम राम राम गाय रे! ।
तरिच धन्य धन्य बाप माय रे! ॥ ध्रुवपद. ॥
आत्मप्राप्तीचाच हा उपाय रे! । धरीं सद्गुरूपाय रे! ॥ राम० ॥ १ ॥
जेणें तुज दिधली नरतनुकाय रे! । त्यासी तूं देसील काय रे! ॥ राम० ॥२॥
संसारीं घालुं नको हाय रे! । देव तुजला होइल साह्य रे! ॥ राम० ॥ ३ ॥
यदृच्छा मिळेल तेंची खाय रे! । रामीं न करीं अंतराय रे! ॥ राम० ॥ ४ ॥
सप्रेमें मोकलोनी धाय रे! । सख्या! रामचंद्रासीं ध्याय रे! ॥ राम० ॥ ५ ॥
कर जोडुनि विनवि कवि अमृतराय रे! । जसी गरिब जबान गाय रे! ॥राम०॥६॥

### पद १० वें.

भवभय निरसावें निरसावें । आत्मसुखांत असावें. ॥ ध्रुवपद. ॥
भागवताचें पुस्तक सोडुनि । झाडातळिच बैसावें ॥ भव० ॥ १ ॥
या लोकाचें येणें जाणें । बसते ठायीं नसावें ॥ भव० ॥ २ ॥

---

१. समुद्रमंथनसमयीं हालाहल पिऊन शंकरास ताप उत्पन्न झाला. त्याचें शमन करण्याकरितां शंकरानें रामनामाचा जप केला—अशी कथा आहे. २. संसाराचे. ३. तनुकाय=लहानसें सुरेख शरीर. ४. अडचण, अडथळा. ५. एकांतांत मनन करावें. हे विचार आंग्लकवीच्या उक्तीशीं जुळतात. आत्मसुखार्थ तत्वविचार करणारांस लोकांचा सहवास नको असतो.

संशय आल्या[1] वाक्य गुरुतें । एकांतांत पुसावें ॥ भव० ॥ ३ ॥
धनकामिनिच्या[2] लोभावरुतें । चित्तांतूनि रुसावें ॥ भव० ॥ ४ ॥
त्यागाविषयीं कठिण कसोटी- । वरि मनकनक कसावें ॥ भव०॥५॥
स्वहितसिद्ध आत्मा कनक प्रपंच । केरांतूनि निसावें ॥ भव० ॥ ६ ॥
अमृतत्वातें साधुनि संतां- । संनिधचि बसावें ॥ भव० ॥ ७ ॥

## पद ११ वें.

ते दुर्लभ दुर्लभ हो ! सज्जन भगवद्भक्त । ते साधू भगवद्भक्त ॥ ध्रुवपद. ॥
सर्वभूतीं[3] भगवद्भावमावरहित ते नाव[4] जनाची हो ! । केवळ जीवन्मुक्त ॥ ते दुर्लभ० ॥ १ ॥
शांत दांत निरपेक्ष मुनीश्वर समदर्शी निर्वैर निरंतर हो ! । सेविति देश विविक्त ॥ ते दुर्लभ० ॥ २ ॥
उठती बसती लोकांसम दिसती वसति तयांतहि अकृतात्मबोधें हो ! । अंतरिं परम विरक्त[5] ॥ ते दुर्लभ० ॥ ३ ॥
सदाचारसंपन्न सुशीतळ अधिगत[6] विधिरत[7] निगमागमवेत्ते[8] हो ! । जाणति युक्तायुक्त ॥ ते दुर्लभ० ॥ ४ ॥
केचिन्हति (?) उन्मति धरुनि जगीं देह गेह विसरुनियां विचरती हो ! । ब्रह्मीं अत्यासक्त ॥ ते दुर्लभ० ॥ ५ ॥
अधिगत तत्व करिति हरिकीर्तन नर्तन नामावर्तन[9] सभाग्य हो ! । वर्णिति देशविरक्त ॥ ते दुर्लभ० ॥ ६ ॥
इतर घांत अन्याय करिति परी तत्तत्प्रत्युपकारी हो ! । अतिशय ते आसक्त ॥ ते दुर्लभ० ॥ ७ ॥
सहज समाधी महापुरुषेश्वर अमृतेश्वर वंदितसे अनुदिनिं हो ! । ज्ञानी उपनिषदोक्त ॥ ते दुर्लभ० ॥ ८ ॥

## पद १२ वें.

हरि मुखीं 'हो हो' करी रे ! ॥ ध्रुवपद. ॥
पार्थाचे रथिं सारथी झाला, भारतिं कीर्ति बरी ।
भारतिचा बहु भार तिलाही नुचले निगम शिरीं ॥ हरि० ॥ १ ॥

---

१. 'झाल्या' असा अन्य पाठ आहे. २. कामिनी=स्त्री. ३. प्राण्यांवर. ४. जनांस भवसागरांतून तारण्याकरितां साधुजन नौका होत. ५. उदासीन. ६. शास्त्रपारंगत. ७. कर्मकांडानुसार आचरणारे. ८. वेदांची उत्पत्ति जाणणारे. ९. नामस्मरणजप.

श्रांत हयांतें क्षाळितां हातें, दांतीं दोर धरी ।
ज्यां धरी श्री[1] अधरपिकेतें 'चुचू' करि समरीं ॥ हरि० ॥ २ ॥
बाणरवें गगनीं रथ थकतां आंवरितो समरीं ।
एकला देउनि कुरवाळित कर त्याचे चरण चुरी ॥ हरि० ॥ ३ ॥
फेनयुतें वदनें वाजींचीं[2] परिमार्जित पदरीं ।
खळ दुर्योधनादिक म्हणती हा आमुचा मुख्य अरी ॥ हरि० ॥ ४ ॥
कवच आंगिचें गांगेयादिकें भेदिलें निगमशरीं ।
क्षतजपरिप्लुत[3] ते चरण स्थित ने यमुने उदरीं ॥ हरि० ॥ ५ ॥
छंद खगेश्वर[4] स्कंधिं वाहुनी ठेविले अंघ्री उरीं ।
ते हरिपाय धरेतळिं लोळति प्रेमवेशें पसरी ॥ हरि० ॥ ६ ॥
तुरंगचरणीं धूसर आननीं पृथु[5] श्रमबिंदु वरी ।
रवि प्रतिबिंबित बिंदुल तेजसे लघु धुतां रानीं करी ॥ हरि० ॥ ७ ॥
विजयरथातें[6] करुनि कुटुंब तो खोवी प्रतोद शिरीं ।
दुर्लभ नेत्रकटाक्ष अजासि तो पाहे अश्वखुरीं ॥ हरि० ॥ ८ ॥
शत्रु पराभव जयजयकारें गर्जिजे नित्य सुरीं ।
अमृततुषारसहित कुसुमांची वृष्टि किजे अंबरीं[7] ॥ हरि० ॥ ९ ॥

## पद १३ वें.

हरि सोहिरा केला । म्यां सख्या ! ॥ ध्रुवपद. ॥
अठ्ठायसिं सहस्र परिवारसहित तो मुनि[8] पातला घरा ।
कर जोडुनि वृंदावनिं विनवी धांव इंदिरावरा ॥ हरि० ॥ १ ॥
करुणाशब्द श्रवणीं पडतां कृपा आली अंतरा ।
गरुडवाहन टाकुनि मागें, त्वरित धांव झरझरा. ॥ हरि० ॥ २ ॥
शाकपत्र अणुमात्रहि नसतां निर्मि स्थाली अंतरा ।
नित्य तृप्त संतुष्ट करि द्विजां वाढित घृत शर्करा. ॥ हरि० ॥ ३ ॥
भक्तकाजकैवारी म्हणविसि गोवर्धनगिरिधरा ।
अमृतराय तव पाय ध्याय निज जन्ममरण दूर करा ॥ हरि० ॥ ४ ॥

१. लक्ष्मी. २. घोड्यांचीं. ३. रक्तानें भरलेले. ४. गरुड. ५. मोठे. ६. अर्जुनरथातें. ७. आकाशांत. ८. दुर्वासऋषि.

### पद १४ वें.

चिंता प्राण्यांची हरीला ॥ ध्रुवपद. ॥
पक्ष्यांपदरीं संचय कैंचा । चारा पुरवि तयांला ॥ चिंता० ॥ १ ॥
कीडमुंगी कांहीं मागत नाहीं । साखर देइ तयांला ॥ चिंता० ॥ २ ॥
अमृत म्हणे हरिघरिं काय उणें । जो जें मागे देई तयाला ॥चिंता०॥३॥

### पद १५ वें.

सांवळा श्रीहरी । वाट कां हो! धरि धरी? ॥ ध्रुवपद. ॥
बाई! मी पाणियाला जातां । मार्गीं उभा होता ॥
मजला झोंबला अवचीता । कां हो याचे···· । गोष्ट हे नोहे बरी ॥ सांव०॥१॥
ऐकुनी····बाजार चालिल्या गौळणी । दहीं दुध घेतलें भरोनी ॥
आनंद करूनी । वाटेवरी उभा···· । हरी उभा हरी ॥ सांव० ॥ २ ॥
जाउनी यशोदेला सांगेन । तुझा कीं मनमोहन ॥
मजला मागतसे चुंबन । हें काय लाजिरवाणं । गोष्ट नव्हे बरी ॥ सांव०॥३॥
बाई! आम्ही सासुरवासिणी । दुर्बळ आमुचा धनी ॥
याणीं धरियेल गवसुनी । काय याचे मनीं । गोष्ट नोहे बरी ॥ सांव० ॥ ४ ॥
बोले अमृतराय शाहिर । देव मोठा थोर ॥
क्रीडा करीतसे अपार । गोकुळाबाहेर । यमुनेतीरीं ॥ सांव० ॥ ५ ॥

### पद १६ वें.

या या मुरलीनें माझें मन मोहिलें, राहिलें काम धाम, श्यामसुंदर कृष्ण मनीं भरुनी उरला जनीं वनीं सये! अनुदिनीं दिसतो. ॥ ध्रुवपद. ॥
सासु सासरा दीर नणद सकळही मज हरिच भासती विपरीत वृत्तांत जो लोकांत तो एकांत निज कांत श्रीकांत गमत शांत मी वेदांतिचा सिद्धांत गिळुनी सुखा आलें अमृतप्राय झालें प्यालें सतत चिन्मय रस तो. ॥ या या०॥१॥

### पद १७ वें.

हरिसीं सतत भजावें रे! मनुजा! ॥ ध्रुवपद. ॥
दुर्लभ हा नरदेहचि जाणुनि । क्रोधादिक वर्जावें रे! ।
निशिदिनीं सुजनपथासि धरुनियां । मुक्तिपदावर जावें रे! ॥ हरि० ॥१॥

---

१. 'सर्वांचीं' असाही पाठ आहे. २. कवि.

दृश्य सकळ हें व्यर्थचि जाणुनि । सच्चित्सुखकर समजावें रे ! ॥
कोण मी कैंचा कोठुनी आलों । हेंचि त्वरित उमजावें रे! ॥ हरि० ॥२॥
दीनदयाघनचरित गाउनी । प्रेमामृतें भिजवावें रे ! ।
गुरुवचनीं विश्वास ठेवुनी । दुर्जनसंग त्यजावा रे! ॥ हरि० ॥ ३ ॥

### पद १८ वें.

जाई जाई मानवा! हरिपायीं रे! ॥ ध्रुवपद. ॥
जन्ममरणमोचक रूप हरीचें । निरंतर गाई रे! ॥ जाई० ॥ १ ॥
दीनपणें पदीं लीन होउनी । सुखकर गुणगण गाई रे! ॥ जाई० ॥ २ ॥
अंतकाळीं कोणी न सोडविती । स्त्रियाबंधुसुतजांवाई रे! ॥ जाई० ॥ ३ ॥
ज्या समयीं जें देइल ईश्वर । तें अमृत म्हणुनी खाई रे! ॥ जाई० ॥ ४ ॥

### पद १९ वें.

गुनियानके तान वंकार मत कठन ।
निपुण गावत कोऊ असल हिंदुस्थान ॥ ध्रुवपद. ॥
अपने अपने देसभाषा भेद कहत ।
दखन कोऊ सुगर मुलतान ॥ गुनि० ॥ १ ॥
जो जो देखें सुर सकल भगवान ।
चरन अर्पन रहि बिकल सब गलतान ॥ गुनि० ॥ २ ॥
अमृतराय साहेबको नायब सोहि सुलतान ।
नरेंद्र राजाराम कोऊ सुगर मुलतान ॥ गुनि० ॥ ३ ॥

### पद २० वें.

जात जोबन हरवारी जिनको त्यावना ।
रंग रंग मोरी सकल बिकल भये कामबिरहकी भावना ॥ ध्रुवपद. ॥
कहिये एक पल रहिये ना तु मनवेग चरनसो आवना ॥ जात० ॥ १ ॥
तुमसों प्यारी मुजकूं आवन हमसें क्यंव कर गावना ॥ जात० ॥ २ ॥
अमृतवचनसे बिनति करत हैं नागर लाल रिझ्यावना ॥ जात० ॥ ३ ॥

### पद २१ वें.

आजि कुंजनमो फूलके फुली ब्रजपतराज ॥ ध्रुवपद. ॥
फुलनके हार रुचिर शृंगारबन ।
फूलनके मुगुट कुंडल बिचित्र सकल साज ॥ आजि० ॥ १ ॥

फूलनके राउटी, फूलनके चौकी[1] ।
फूलनको बीखो अनुपम से जहाज ॥ आजि० ॥ २ ॥
फूल रहि ग्वालन हरदम दम गावत ।
आन अलापत पखवाजन की आवाज ॥ आजि० ॥ ३ ॥
अमृतराय साहेब सों आप मों अर्पन दर्पन ।
अप सुर सुर नर सिरताज ॥ आजि० ॥ ४ ॥

### पद २२ वें.

बांके बनवारी अधरपर मुरलीरव तरल तर नैन हर ॥ ध्रुवपद. ॥
चरन पर चरन धर नेक तेडे खडे ।
पाव तेंडी लग्यो शगर चंदन अत्तर ॥ बांके० ॥ १ ॥
अलखकी खलक मुद्रा तिलक केशरी ।
खलके करतार खल चंदन अति चतुर ॥ बांके० ॥ २ ॥
शक्र की बक्रता चक्रबिन दुर करे थक्क कोया ।
पराक्रम थकित सुर असुर ॥ बांके० ॥ ३ ॥
झुलत कलगी कहत कल गीत संगीत- ।
रीतसो अमृत धुन परमपद पायो ॥ बांके० ॥ ४ ॥

१. चौरंग.

# अमृतरायकृत नवीन पदें.

## पद २३ वें.

हा देह जाइल रे! । पुण्य कामा येईल रे! ॥ ध्रुवपद. ॥
मोहित होउनियां विषयीं । किती करसिल 'बाइल बाइल' रे! ॥ हा० ॥ १ ॥
जंववरी आंगीं शक्तिधन । तंववरी ते गीत गाइल रे! ॥ हा० ॥ २ ॥
अमृतेश्वर म्हणे सर्वही सोडुनी । 'हरिहर' म्हणतां सार्थक होइल रे! ॥ हा०॥

## पद २४ वें.

लाडका[1] तुझा जेगजेठी[2] । याला चार तूप रोटी ॥ ध्रुवपद. ॥
वोढाळाची ढाळ कोटी । मारला जाइल यासाठीं ।
घरोघरीं दूध लुटी । झाला सांड[3] तुझ्या पोटीं ॥
चाल ॥ बाइ! यशोदे! ऐक गाऱ्हाणें । तूं तंव म्हणशील बाळक तान्हें ।
सात बाळकें वधिलीं यानें । निमित्ता केलेंसे कां सोनें? ।
तोड ॥ तुम्हा दिधलें वडिलपणें । गौळ्या शिक्षा एवढ्यासाठीं ॥ तुझा० ॥ १ ॥
तुझें गोकुळ पडो वोस । आम्हा पडेल चार देश ।
यथच काय पडतो पाउस । नाहीं आमुची मिरास[4] ॥
चाल ॥ यशोदा म्हणे 'ऐक बाळा! ऐसें कां करणें गोपाळा! ।
या करणीनें वोस गोकुळा । पडेल कीं रे! बा! घननीळा! ।
तोड ॥ वनासी जाई गोधनपाळा' । अमृत म्हणे उरेना गोष्टी ॥ तुझा०॥२॥

## पद २५ वें.

किती करिसिल बाइल रे! बाइल रे! । तुज खाइल रे! ॥ ध्रुवपद. ॥
बाळी बुगडी चोळी लुगडी । ऐसी सगडी लावियली रे! ॥ किती० ॥१
अटक चटक मटक दाउनी । मन तुझें मोहिलें रे! ॥ किती० ॥ २ ॥
अमृत म्हणे तुजजवळी पैसा । तोंवरी गीत गाइल रे! ॥ किती० ॥ ३ ॥

## पद २६ वें.

कांहीं तरी सोय धरीं रे! ।
परमवरदकर सुरुचितर नरनारायण हा अनुदिनीं मनीं जप करीं रे! ॥ ध्रुवपद.॥
नंदनंदन गोविंद दीनबंधू म्हणुनी भव[5] तरीं रे! ।
करुणावरुणालय[6] शरणागतपरिपालन पदवी रे! ॥ कांहीं० ॥ १ ॥

---

१. व्रजस्त्रिया कृष्णाचीं गाऱ्हाणीं यशोदेस सांगतात. २. जगज्ज्येष्ठ, सर्वांहून श्रेष्ठ. ३. उनाड बैल. ४. वतन. ५. संसार. ६. दयार्णव.

पशुसम होशिल विषयीं निरंतर रत किती रे! ।
परत परत अंतरीं रे! नरतनु दुर्लभ[1] दुर्लभ सखया वदवद नरहरी रे! ॥कां०॥
कांहीं भरीं भरूं, धरीं रमापती बुडशिल या भवपुरीं[2] रे! ।
अमृतराय तव पाय धरुनियां विनवी बहु बहु परी रे! ॥ कांहीं० ॥ ३ ॥

## पद २७ वें.

निष्ठुर अतिक्रूर तुम्ही बोलुं नका हरिला ॥ ध्रुवपद. ॥
काय दुग्ध याचें पाणी । कोठें दुष्ट दुष्ट वाणी ।
माझा मोहन घेऊन जातो गौधन[3] नित्य रानीं ॥ निष्ठु० ॥ १ ॥
आधींच घर असती लंके (?) । त्यावरी तो उंच शिंके ।
नित्य येतो दूध पितो वचन हे लटिकें ॥ निष्ठु० ॥ २ ॥
क्षणभरी घरीं नसतो कान्हा । माझे स्तनीं येतो पान्हा ।
जिवींचा जीव सकळ जाणा । बाळ हरी तान्हा ॥ निष्ठु० ॥ ३ ॥
अमृत म्हणे निज खुणे । हरिवांचुन व्यर्थ जीणें ।
सदनीं[4] जाउनी बल्लवी[5] त्या । ध्याती प्रभुचरण ॥ निष्ठु० ॥ ४ ॥

## पद २८ वें.

अंमल[6] खुब गाजा गाजा । जिनकू राजी परजा[7] ॥ ध्रुवपद. ॥
जनार्दनका[8] एका[9] । पैठण तख्त किया सर[10] निको[11] ॥ अंम० ॥ १ ॥

१. मिळण्यास कठीण. येथें स्वाभिप्रायदार्ढ्यास्तव 'दुर्लभ' 'दुर्लभ' अशी द्विरुक्ति केली. २. संसाररूप पुरामध्यें. ३. गौ=गाय. ४. गृहीं. ५. गौळिणी. ६. ज्यांची प्रजा राजी त्यांचा अंमल खूब गाजला. ७. प्रजा. ८. हें एकनाथ स्वामींच्या गुरूचें नांव. हे महान् साधु व दत्तभक्त होते. ९. एकनाथ—हा साधु ब्राह्मण कवि ज्ञानदेवाचा अवतार असें समजतात. याचा जन्म शके १४७० या वर्षीं झाला असें दिसतें. याचा मरणशक १५२१ फाल्गुन वद्य ६ असें आढळतें. याची कविता (१) एकनाथी भागवत, (२) भावार्थरामायण, (३) रुक्मिणीस्वयंवर, (४) स्वात्मसुख, (५) हस्तामलक (६) आनंदलहरी, (७) चतुःश्लोकी भागवत टीका, (८) अभंग, (९) पदें—इतकीं प्रकरणें मराठी असून कांहीं कविता हिंदुस्थानी भाषेंतही आहे. याच्या गुरूचें नांव जनार्दनपंत होतें म्हणून त्यानें आपल्या कवितेंत आपलें नांव '**एकाजनार्दन**' असें लिहिलेलं आढळतें. याची वाणी रसाळ आणि सरळ असून वर्णन करण्याची शैली मनोहर आहे. एकनाथानें मराठी भाषेवर केवढे उपकार केले या विषयाचें प्रतिपादन '**एकनाथाचें चरित्र**' नामक पुस्तकांत आणि आमची देशी भाषा विद्यापीठीं शोभण्यासारखी आहे कीं नाहीं?' या व्याख्यानांत प्रो० **राजाराम रामकृष्ण भागवत** यांनीं केलें आहे तें पाहण्यासारखें आहे. महिपतीच्या 'भक्तलीलामृतां'त (अध्याय १३-२४) एकनाथाचें सविस्तर चरित्र आहे. याशिवाय रा० धोंडो बाळकृष्ण सहस्रबुद्धेकृत 'श्रीएकनाथ महाराज यांचें चरित्र' हें पुस्तकही पाहण्यालायक आहे. १०. सर करणें=जिंकणें, ताब्यांत घेणें. ११. खरोखर.

ज्ञानेश्वरका धैवसा । डैरकर बेद बोले म्हैसा ॥ अंम० ॥ २ ॥
विठ्ठलकू देखना । लिया पंढरपुरका ठाना ॥ अंम० ॥ ३ ॥
रामानंदका पुरजी । उनकू बारा सोला राजी ॥ अंम० ॥ ४ ॥
मुकुंदराज बोले । राजा जयंतपाळ बंद खोले ॥ अंम० ॥ ५ ॥

---

१. **ज्ञा**नदेव ह्याचा जन्म शके ११९७ श्रावण वद्य ८ स **आ**ळंदी येथें झाला, आणि तेथेंच हा शके १२१८ कार्तिक वद्य ८ स समाधिस्थ झाला. यास **ज्ञा**नेश्वर, **ज्ञा**नोबा असेंही म्हणतात. याचे ज्ञानेश्वरी (भावार्थदीपिका), अमृतानुभव, आणि चांगदेवपांसष्टी असे मुख्य ग्रंथ आहेत. याची कविता प्रासादिक आणि गहन असून तिचा विषय भक्ति, वैराग्य आणि आत्मबोध हा आहे. ह्याची वाणी रसाळ, उपमारूपकादिकालंकारपूर्ण आहे. याची वर्णन करण्याची शैली इतकी चटकदार आहे कीं वर्ण्य विषयाची प्रतिमा प्रत्यक्ष डोळ्यांपुढें उभी केलेली असते. इतकें आहे तथापि याचे ग्रंथ गहनविचारांनीं भरलेले असल्यामुळें ते सहज समजण्यासारखे नाहींत. याचीं पदें, अभंग इत्यादि कविता ही गहन आहे व तिच्यावर त्याच्या ग्रंथांतील प्रमुख विचारांची छाया पडली आहे. **'ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र'** या नांवाचा ग्रंथ रा०**ब**ळवंत **खं**डोजी **पा**रख यांनीं लिहिला आहे तो जिज्ञासु जनांनीं पाहिला असतां या कवीची ओळख चांगली होण्यासारखी आहे. २. ध्वज, ध्वजा, पताका. ३. भिऊन. ४. रेडा, हल्या. ५. **वि**ठोबा, **वि**ठ्ठल, **वि**ठाई हीं सर्व एकाच देवाचीं नांवें होत. **वि**ठोबा हा **कृ**ष्ण होय. एकदां **रा**धा **कृ**ष्णाच्या मांडीवर बसली असतां तेथें **रु**क्मिणी आली, तेव्हां **रा**धेनें तिला अभ्युत्थान दिलें नाहीं म्हणून ती आपला अपमान झाला असें समजून रागानें **दिं**डीरवनांत येऊन तपश्चर्या करूं लागली. जेथें हल्लीं **श्री**पंढरपुर क्षेत्र आहे तेथें पूर्वीं दिंडीरनामक दैत्याचें वन होतें. या वनांत **रु**क्मिणी असतां **कृ**ष्णानें तेथें येऊन तिची मनधरणी करून समजूत केली. नंतर त्या दोघांनीं तेथें **'विठोबा रुक्माई'** हीं नांवें धारण करून अखंडवास केला—असें वर्णन ग्रंथांतरीं आहे. ६. ठाणें. ७. हा कबीराचा, व ज्ञानेश्वर, निवृत्ति इत्यादिकांचा बाप जो विठ्ठलपंत, त्याचा गुरु. यानें **'आनंद'** नांवाचा नवा संप्रदाय काढिला, तो उत्तर हिंदुस्थानांत चालू आहे. हा मोठा विद्वान् होता. ८. **मु**कुंदराज या नांवाचा एक साधु कवि सुमारें सातशें वर्षांपूर्वीं झाला. हा जातीचा देशस्थ ब्राह्मण असून **'जोगाईचें आंबें'** या गांवचा राहणारा होता. 'जोगाईचें आंबें' म्हणजे जाधवकुळांतील जयंतपाळाचें प्रधाननगर (राजधानी) हें निझामशाहींत असून त्याला हल्लीं **'मोमीनाबाद'** म्हणतात. मुकुंदराजानें जयंतपाळास आत्मज्ञानाचा उपदेश करण्यासाठीं **'विवेकसिंधु'** नामक ग्रंथ रचिला. याचा **'परमामृत'** म्हणून दुसरा ग्रंथ आहे. या ग्रंथांतील प्रतिपादन शांकरदर्शनानुसारी आहे. याची वाणी शुद्ध, प्रौढ आणि सरळ आहे. याची समाधि 'जोगाईच्या आंब्या' स डोंगराच्या कड्यावर आहे. ९. जयंतपाळ हा वीरबल्लाळ राजाचा पुत्र. या राजाला ब्रह्मविचार फार आवडत असे, म्हणून तो साधूंचा सन्मान करून त्यांस म्हणे कीं घोड्यावर बसतांना एका रिकिबींत पाय घालून दुसरींत घाली घाली तों मला ब्रह्मसाक्षात्कार करून द्या. कोणाच्यानेंही ही गोष्ट करवेना; म्हणून यानें पुष्कळ साधूंस बंदींत घातलें. हें वर्तमान मुकुंद-

सेना सेजणा कसाई । ये मौलाके सिर्फ सिपाई ॥ अंम० ॥ ६ ॥
अमृतराय कहे बिरजीका । चलते बैकुंठ लेवे तूका ॥ अंम० ॥ ७ ॥

## पद २९ वें.

दौलत खुब पायी खुब पायी । हरिपगसो अबलाई ॥ ध्रुवपद. ॥
मागत दूध उपमन्यू । उनकू दिया क्षीरसागर ॥ दौलत० ॥ १ ॥

---

राजास कळतांच तो राजाकडे आला व त्यानें राजास समाधी लाविली. पुढें मुकुंदराजांनीं त्यास सावध केलें, मुकुंदराजाच्या सांगण्यावरून राजानें बंदींतील साधूंस मुक्त केलें.

१. याची कथा 'भक्तविजय' अध्याय ३४ ह्यांत पहावी. या साधूविषयीं मोरोपंतानें आपल्या 'सन्मणिमाले'त असें म्हटलें आहे:–'जो भक्तिसरित्पूरीं षडरींची सर्व वाहवी सेना, । रुचला मनास बहुतचि, तो, भगवद्भक्त, नाहवी सेना. ।।' [गीति ५३]. २. मोरोपंतकृत 'सन्मणिमालेंत' या साधूचा असा उल्लेख आहे:–'सजणा नाम जयाचें, ज्या, गाती साधुजन, कसायास । भगवान पळहि न विसरे ज्यातें, विसरेन मी कसायास? ।।' [गीति ५४]. ३. परमेश्वराचे. ४. फक्त, केवळ. ५. हा पंढरपूरच्या पांडुरंगाचा एक भक्त होता. हा शालिवाहन शके १५३० मध्यें देहूस जन्मला. हा जातीचा वाणी होता. ह्याला दोन बायका होत्या. पहिली बायको दमेकरीण होती ती लवकरच वारली. दुसरी बायको जिजाबाई मोठी कर्कशा होती. ह्याच्या सत्राव्या वर्षी ह्याचीं आईबापें वारलीं. ह्याचा मृत्यु शके १५७१ त झाला. ह्याचे अभंग पुष्कळ आहेत. विशेष माहिती भक्तविजय अध्याय ४८ व ४९ यांत पहावी. या शूद्र कवीविषयीं आणखी माहिती कै० **हंस** यांच्या निबंधांत व रा० रा० **रा० वि० माडगांवकर** यांच्या पुस्तकांतही आहे. ती जिज्ञासु वाचकांनीं पहावी. ६. संपत्ती. ७. पग=पाय. ८. उपमन्यू–वसिष्ठकुलोत्पन्न व्याघ्रपाद नामक मुनीचा ज्येष्ठ पुत्र. हा लहान असतां बहुतकरून घरींच खेळत असे. एकदां हा दुसऱ्या आश्रमांतील मुलांसह खेळत असतां तेथें यानें गाईचें दूध काढतांना पाहिलें, व तेथील मुलांच्या मातेनें तेथील मुलांस व यास गोरस पान करण्यास दिलें व तें तो प्याला. नंतर तो आपले घरीं आल्यावर आपले मातेजवळ गोरस मागूं लागला. तेव्हां ह्याच्या मातेनें नित्याप्रमाणें पिष्ट पाण्यानें कालवून त्याला दिलें परंतु तें तो न घेतां 'काल मी त्या दुसऱ्या आश्रमांत दूध प्यालों तसें दे' असें म्हणूं लागला. तेव्हां त्याची आई जरा खिन्न होऊन म्हणाली कीं 'असें दूध तुला मिळण्यायोग्य तुम्ही नाहीं, कारण पूर्वजन्मीं तुझ्या हातून ईश्वराराधन घडलें नाहीं.' यावरून त्यानें ईश्वराराधन करून आकल्प आयुष्य व समग्र क्षीरसागराचें आधिपत्य अशीं संपादन केलीं–अशी कथा आहे. हा शैव होता व कृष्णासही यानेंच शैवी दीक्षा दिली. हा धौम्य ऋचीचा ज्येष्ठ भ्राता व तंडी ऋषीचा शिष्य होता. (विशेष माहिती महाभारत–अनुशासनपर्व–अध्याय १४ यांत, अथवा सौरपुराण–अध्याय ३६ यांत पहावी.)

बेटकू ध्रु[1] रोवे । उनकू सबसे सिरोपद[2] देवे ॥ दौलत० ॥ २ ॥
नक्रकु दे फटका । गजदासनके[3] छुटका ॥ दौलत० ॥ ३ ॥
अमृतरायका चुटका । लेत रामनामका घुटका[4] ॥ दौलत० ॥ ४ ॥

१. ध्रुव–उत्तानपाद राजास त्याच्या सुनीती नामक भार्येपासून झालेला पुत्र. या राजास सुनीति व सुरुचि अशा दोन भार्या होत्या, त्यांत सुनीति ही नावडती होती, त्यामुळें तिचा पुत्र ध्रुव हाही नावडता होता. एकदां याचा सावत्र भाऊ राजाच्या मांडीवर बसला असतां हाही बसण्यास गेला, पण हें सुरुचीला आवडलें नाहीं व तिनें त्याचा धिक्कार केला. तेव्हां हा रडत रडत आपल्या-मातेकडे (सुनीतीकडे) गेला व झालेली गोष्ट तिला सांगितली, तेव्हां तिलाही फार वाईट वाटून ती म्हणाली, परमेश्वराची आराधना केल्याशिवाय हें ऐश्वर्य कोठून प्राप्त होणार? तेव्हां ह्याला पश्चात्ताप होऊन लागलाच अरण्यांत जाऊं लागला, इतक्यांत मार्गामध्यें ध्रुवाला नारद भेटले. त्यांनीं 'तूं लहान आहेस, परत जा' असें सांगितलें, पण ह्यानें ऐकिलें नाहीं. नारदमुनींस याची दया येऊन त्यांनीं यास एक मंत्र व भगवद्ध्यान ह्यांचा उपदेश केला. अल्पकाळांत यास भगवंतांनीं भेट दिली म्हणून याच्या मनांत स्तुति करावी असें वाटलें; पण सामर्थ्य नसल्यामुळें हस्त जोडून उभा राहिला. तेव्हां हें जाणून परमेश्वरानें त्यास सामर्थ्य दिलें, व यानें स्तुति केली. तीवरून परमेश्वर संतुष्ट होऊन 'तूं छत्तीस सहस्र वर्षें पित्याच्या मागें राज्य कर व या स्थानीं परत ये' असा वर दिला. हें सर्व वर्तमान उत्तानपाद राजास कळलें, व तो समारंभपूर्वक सामोरा येऊन ध्रुवास परत नगरास घेऊन गेला, व त्याला राज्याभिषेक करून आपण अरण्यगमन केलें–अशी कथा आहे. (भागवत–स्कंध. ४ अ० ८-९.) २. श्रेष्ठस्थान. ३. गजेंद्र–ही कथा श्रीमद्भागवत–स्कंध ८. अध्याय २–४ यांत आहे. क्षीरसागरांत त्रिकूट नामक एक पर्वत होता. त्याच्या खालच्या तटावर वरुणाचें ऋतुमत् नामक उद्यान होतें, आणि त्यांत एक अत्यंत रमणीय सरोवर होतें. तेथें उन्हानें संतप्त आणि तृषार्त असा एक गजेंद्र आपल्या कळपासह पाणी पिण्यासाठीं आला. तो सरोवरांत प्रवेश करून तेथील पाणी यथेच्छ पिऊन बाहेर येऊं लागला, तों त्याला एका सुसरानें पकडिलें. तेव्हां त्यानें नक्राच्या हातून सुटण्याचा पुष्कळ यत्न केला, परंतु सुटेना. त्याची सुटका करण्यासाठीं इतर गज, गजस्त्रिया, आणि कलभ (गजशावक) यांनींही पुष्कळ प्रयत्न केला. पण त्यांचेंही कांहीं चालेना. या उद्योगांत हजार वर्षें गेलीं; सर्व उपाय हरले. अखेरीस निरुपाय होऊन गजेंद्रानें हें प्राणसंकट टाळण्यासाठीं परमेश्वराचा धांवा केला. (अध्याय ३ श्लो० २-२९) 'मी ग्राहापासून मुक्त होण्याची इच्छा करीत नाहीं, तर अज्ञानमोक्षाची इच्छा करतों' इत्यादि गजेंद्रानें केलेलें स्तोत्र ऐकून प्रसन्न होऊन श्रीभगवान हरि प्रकट झाला. त्याला पाहतांच 'हे नारायणा! अखिलगुरो! भगवन्नमस्ते' असें म्हणून गजेंद्रानें सोंडेनें एक कमळ उपटून भक्तिभावानें त्याच्या प्रीत्यर्थ वर आकाशांत फेंकून दिलें. तेव्हां त्या पीडिताला पाहून विष्णूला दया आली. त्यानें एकदम गरुडावरून उतरून सग्राह गजेंद्राला सरोवराच्या बाहेर काढून चक्रानें नक्राचें तोंड कापून त्यास सोडविलें. (अध्याय ३ श्लोक ३३.) ४. 'नामरसायण घुटका' असा अन्य पाठ आढळतो.

## पद ३० वें.

महाराज पांडवघरमें दासनके दास बिचारे ॥ ध्रुवपद. ॥

ब्रिजके [1]ग्वालरूप अवतारे । बकी अघासुर संहारे ।

[2]नखसों गोवर्धन उठावे । सो प्रभु अघबक कंस उद्धारे ॥

उठाव ॥ सो प्रभु [3]राजसाहिमें अग्रपूजे अति उग्र तेज शिशुपाल कालसों मार डालके ब्रजको झूटी भूमी कोहे बार बार परखारे ॥ महाराज० ॥ १ ॥

चारों भुजसों आयुध डारे । झुटे पातक [4]मेटे सारे ।

[5]हिरदे उठाय लिये हे त्रारे । लक्ष्मी कौस्तुभ सो है प्यारे ॥

उठाव ॥ जापर दधि दुध घृतके प्रवाह छुटे श्यामतनूके पीतांबर पर भांत भांतके तऱ्हे तऱ्हेके बुटे चितरे न्यारे ॥ महाराज० ॥ २ ॥

कबहु छडी बगलमें मारे । ले संदेसा पटक सवारे ।

रथसे गाडीवान सवारे । तमाम घोडे चरावे दौरे ॥

उठाव ॥ रथ जोतके पोछ पांछके ललकार करतहे मुखसे 'होरे होरे' ॥ महा० ॥ ३ ॥

याचक होके हात पसारे । भूप जरासंधको मारे ।

कपटी कौरवको संहारे । [6]निजजन है सों पार उतारे ॥

उठाव ॥ [7]मखमों अर्जुनपें जब गांठ पडी तब होय सिपाइ जुलाल रथसे कूद पडे चक्र उठाय लिये जाय अकेले भीष्म पितामहाजी पर दौरे ॥ महा० ॥ ४ ॥

बजाज द्रौपदिके बिहारी । [8]पट पहिरवे न्यारे न्यारे ।

[9]छोरे मथुराके है [10]पौरे । ब्रिज चेटक हे नंददुलारे ॥

उटाव ॥ कामी पार्थ जानकें भये मेहरिया रूप सुभद्रा लिए लिला नाटक कैकै प्रकारे भक्त [11]रिझावत अमृतराय कहि मायातीपर बारबार बलहारे ॥ महाराज० ॥ ५ ॥

## पद ३१ वें.

[12]राखीं लाज अनंता! आतां ॥ ध्रुवपद. ॥

१. गौळ्यांच्या रूपानें. २. नखानें. ३. राजसूययज्ञांत. ४. सर्व पातकें मिटविलीं—नाहींशीं केलीं. ५. हृदयांत. ६. आपले भक्त. ७. राजसूययज्ञांत. ८. वस्त्र. ९. मुलें. १०. मथुरानिवासी. ११. सुखवीत असे, सुख देत असे. १२. द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं द्रौपदीनें केलेला कृष्णाचा धांवा.

कुमति सुयोधन विनयें जल्पत ।
मति भ्रमलीच समस्तां ॥ आतां० ॥ १ ॥
कुरळीं[1] आकर्षुनि खळ मज पीडिति ।
केचसंचय[2] धरूनि हातां ॥ आतां० ॥ २ ॥
स्थिरचरव्यापक श्रीहरि असतां ।
भोगीं कशी अवस्था मी? ॥ आतां० ॥ ३ ॥
खळ आतां हे फेडति लुगडें ।
करिती कठिण अनर्था ॥ आतां० ॥ ४ ॥
अमृत माधव प्रभु मन गरुडा ।
कां न पळवि हृदयस्था ॥ आतां० ॥ ५ ॥

### पद ३२ वें.

पंढरीचा नाथ पहा पांडुरंगजी ॥ ध्रुवपद. ॥
नंदनंदन हरि गोविंद श्रीमुकुंदजी ।
केशव माधव यादव कृष्ण वासुदेवजी ॥ पंढरी० ॥ १ ॥
पूर्णब्रह्म परब्रह्म हेंचि वर्म जी ।
नाभिकमळीं ब्रह्म, शिरीं ज्योतिर्लिंग जी ॥ पंढरी० ॥ २ ॥
त्र्यंबकासि अमृतराय ध्याय पाय जी ।
ब्रह्मपदीं गरुड करुनि करित दंग जी ॥ पंढरी० ॥ ३ ॥

### पद ३३ वें.

पशुपति[3] ऐसें दैवत न गमे त्रिभुवनीं दुसरें ।
कृपाकटाक्षें चुकवी लक्ष चौऱ्यायशीं फेरे ॥ ध्रुवपद. ॥
वाजन करितां दिसेल जो गज अश्वांचा पाल ।
महालमंदिर सुंदर कांता मंगळवत सोहळा ॥
दीर्घायुष्य देऊनि भोगवि संपतिचा सोहळा ।
नित्य शिवाशीं वाहति बेल ॥ पशुपति० ॥ १ ॥
त्रिकाळ मंत्र पूजुनि वाजवि हस्ताची टाळी ।
'शिव शिव' वदतां मात्र होय पापाची होळी ॥
सप्तजन्म पातक हरहर म्हणतां दुरी ॥ पशुपति० ॥ २ ॥

---

१. केशांच्या ठायीं. २. वेणी, केशकलाप. ३. शिव. यांत शिवाचें स्तवन आहे.

[1]इंदुवासर प्रदोष शिवरात्री व्रत तिसरें ।
शचिपति श्रीपति व्रत हें करिति ब्रह्मा सावित्री ।
[2]चतुर्वर्णाचे राजे करिती व्रत हें ।
सकळ मनोरथ पावुनि अंतीं [3]अमृतेश्वरप्राप्ति ॥ पशुपति० ॥ ३ ॥

## पद ३४ वें.

भगवंतासाठीं जिवलगा! अवघ्या [4]तुटी. ॥ ध्रुवपद. ॥
भरतें त्यजिली माता । प्रल्हादें चिरवीला पिता ।
बिभीषणें त्यजियेला भ्राता । एका रामपदासाठीं ॥ १ ॥
श्रवेनें उपकर्णाचे अंतीं । हरिश्चंद्रें त्यजिली तारामती ।
रोहिदासें त्यजिली कांती । एका रामपदासाठीं ॥ २ ॥
श्रियाळें त्यजिला पुत्र । भक्तराजवैकुंठपाळमित्र ।
अमृतेश्वराचे भजनीं सुमित्र । एका रामपदासाठीं ॥ ३ ॥

## पद ३५ वें.

येउनियां जन्मा काय केलें रे? ॥ ध्रुवपद. ॥
मी देह हें घेउनि ओझें नाचति भोजें ।
परि खाजें काळाचें जालें रे! ॥ येउनियां० ॥ १ ॥
सकळ विषयीं मन विकळ करिसि ।
परि न कळे स्वहित वय व्यर्थचि गेलें रे! ॥ येउनियां० ॥ २ ॥
सुंदर नरतनु पावोनि उत्तम ।
श्रीसर्वोत्तमपद चुकलें रे! ॥ येउनियां० ॥ ३ ॥
अमृतवचन हें [5]बुंझुनि आजुनि तरि ।
रिझुनि हरिसि भज, सार्थक कथिलें रे! ॥ येउनियां० ॥ ४ ॥

## पद ३६ वें.

हरि सखा करणें तरी हें सार [6]जिणें ॥ ध्रुवपद. ॥
हरिकथा उपदेश जयाचा । साधुसंगति आदरें धरणें रे! ॥ हरि० ॥ १ ॥
सज्जनरंजन मुख्य हें साधन । हरिगुण कीर्तनिं या रमणें रे! ॥ हरि० ॥ २ ॥
विभुलीलामृत समृत गायन । निश्चळ भवजळीं या तरणें रे! ॥ हरि० ॥ ३ ॥

---

१. सोमवार. २. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या चार वर्णांचे. ३. 'अंबेश्वर' असें पाठांतर आहे. ४. वियोग. ५. समजुनि. ६. जगणें.

## पद ३७ वें.

(गुरुशिष्यसंवाद.)

गुरुजी! मला शिष्य करा । आत्मा आपण मौन धरा ॥ १ ॥
सनकादिकीं धरिलें मौन । त्याचें बोलणें मौनाचें मौन ॥ २ ॥
मौनासारिखे कोणते बोल । स्वानुभवाचे सहज डोल ॥ ३ ॥
स्वामी अनुभव तो कैसा भेटे । सद्गुरुकृपे संशय तुटे ॥ ४ ॥
सद्गुरु कृपा करितील कैसी । त्यांचे चरणीं व्हावें दासी ॥ ५ ॥
दासीपण तों कठीण आहे । द्वारीं पडोनि उगाचि राहें ॥ ६ ॥
उगाचि पडोनि होईल काय । येतां जातां लागतील पाय ॥ ७ ॥
पाय लागल्या कोणती सिद्धि । प्रपंचांतुनि फिरेल बुद्धि ॥ ८ ॥
फिरली बुद्धि कैसी कळे । जैं संतांचे मिळणीं मिळे ॥ ९ ॥
संत सांगा कैसे दिसती । सर्वही लोक स्तवन करिती ॥ १० ॥
लोकस्तवनीं होईल संत । स्वयें परीक्षुनि घ्यावा अंत ॥ ११ ॥
अंत लागल्या काय झालें । नित्य सेवावीं पाउलें ॥ १२ ॥
पाउलें करितील देव ठावा । लवुनि प्रश्नही करावा ॥ १३ ॥
प्रश्न करितां देव दिसे । जनीं वनीं तोचि भासे ॥ १४ ॥
तोचि भासल्या आपण कोण । आपण देव नाहीं दोन ॥ १५ ॥
आपण देव तो कैसा लक्षी । जागतां निजतां मनाचा साक्षी ॥ १६ ॥
मजला दिसत माझेंचि मन । तरी तूंचि कीं तुम्हां वेदवचन ॥ १७ ॥
एक वेदचि काय प्रमाण । आपण वेद गुरु तिघेजण ॥ १८ ॥
तिन्ही प्रतीति जवळीच कीं त्या । विचार करितां जवळीच होत्या ॥ १९ ॥
विचार कां हो न करी सोपा । मायेनें घर घेतलें बापा ॥ २० ॥
ब्रह्मीं मायास्फुरण दिसते कैसी । सूर्यापासुनि मृगजळ जैसी ॥ २१ ॥
मृगजळडोहीं[1] हरणें भुलती । मनुष्यें हीं हरिणेंच होती ॥ २२ ॥
मनुष्यपणा तो कठीण आहे । आपणाआपण शोधुनि पाहे ॥ २३ ॥
शोधुनि पाहतां आपणचि आघवें । मौन्यें मौन हेंचि बरवें ॥ २४ ॥
हा तों झाला बोलका मुका । उपजत मुका तो स्वरूपीं चुका ॥ २५ ॥
मुकेपण तों सुखाचें सार । कैसा होईल जगदोद्धार ॥ २६ ॥

---

१. हा समास चिंतनीय आहे.

यास्तव देव धरी अवतार । तरी तूंचि करीं बा विचार ॥ २७ ॥
आतां स्वामी वंदीन पाय । तुझेंचि नाम अमृतराय ॥ २८ ॥

## पद ३८ वें.

(गुरुशिष्यसंवाद.)

गुरुजी! मला सुखाची वाट सांगा । घर टाकुनि रानांत वागा ॥ १ ॥
रानांत काय सुख आहे । उगाचि घडीभर जाउनि पाहावें ॥ २ ॥
रानांत जाउनि काय खावें । निःसंग साचा फकीर व्हावें ॥ ३ ॥
फकिरास पाहुनि कुत्रें भुंकतें । फिरतोसि कां म्हणोनि तोंडावर थुकतें ॥ ४ ॥
फकीर बसल्या उगाच बसतें । ऐसेंच बसावें म्हणुनि उपदेश करितें ॥ ५ ॥
तेव्हां गुरु कुत्रें । भटकल्या माणसावरी सुत्रें ॥ ६ ॥
कुत्र्यास कांहीं आहे विचार । धरिलें एक तें न सांडी द्वार ॥ ७ ॥
पोटभरी भाकरी मिळे एक घरीं । ओली कोरडी हाक न मारी ॥ ८ ॥
हाकेविण दुःख कोण समजतो । निश्चयानें बैसल्यास देव देतो ॥ ९ ॥
बैसल्या कैसा निर्वाह होतो । अजगर कोठें फिरावयासी जातो ॥ १० ॥
अजगरासी नाहींत बायकांचे धोके । त्याचें संतान कोठुनि पिके ॥ ११ ॥
भुला भटकल्या होय संयोग । ऐसेंच वाटे सर्व जग ॥ १२ ॥
तरी माणसाचीच काय खटपट । मानुनि घेतलें म्हणुनि लागलें झट ॥ १३ ॥
लागलें झट हें केव्हां पळे । आपण ब्रह्म हें आपणा कळे ॥ १४ ॥
ब्रह्म कळल्या मुक्ति मिळे । मिळालेपणही समूळ गळे ॥ १५ ॥
होता झाला अद्वैतभाव । पूर्ण सुखाचा हाचि ठाव[1] ॥ १६ ॥
रानांत जावें हा हट । कोठेंना त्याचें मन नाहीं घट ॥ १७ ॥
मन घट झाल्या गांव बरा । दुःखाच्या हवया लागती पोरा ॥ १८ ॥
दुःख तिळभरी सोसेना । चाल रानांत नको देऊं वेणा ॥ १९ ॥
रानांत जाउनि काय करावें । पोटापुरतें गांवांत यावें ॥ २० ॥
गांवचे लोक करितील उपहास । खालीं पाहुनि मागावा घांस ॥ २१ ॥
घांस न मिळे तरी पडतील उपवास । सोशीत जावें होउनि उदास ॥ २२ ॥
उदास जाहल्यावर होईल बोध । रात्रंदिवस करावा शोध ॥ २३ ॥
शोध सांगे अमृतराय । सुखस्वरूप श्रीसद्गुरूचे पाय ॥ २४ ॥

१. स्थळ, जागा.

## पद ३९ वें.

या संन्यासा काय म्हणावें? ॥ ध्रुवपद. ॥
डोई मुंडुनि भगवें गुंडुनि । पिशवींतील द्रव्यासि गणावें ॥ या० ॥ १ ॥
भिक्षे सांगूं जातां बरवें । नित्य निमित्यासि पुसावें ॥ या० ॥ २ ॥
अमृतराय म्हणे या कपटपटूच्या । कां न म्यां तोंडांत हणावें[1]? ॥या०॥३॥

## पद ४० वें.

मना! रामाचे गुण गाईं ॥ ध्रुवपद. ॥
पदरजस्पर्शें गौतमजाया । पावन झाली पाहीं ॥ मना० ॥ १ ॥
भंगुनि चापा, लज्जित रावण । पेंर्णुनियां[2] वैदेही[3] ॥ मना० ॥ २ ॥
मारुनि दुष्टां अमृतराय । सदा हृदयीं ध्यायी ॥ मना० ॥ ३ ॥

## उपदेश.

(कटिबंध.)

संतांचा सेवक होउनि श्रीहरिलागीं भजेना ॥ ध्रुवपद. ॥
आपण असतां आत्माराम, केवळ उपनिषद् विश्राम, चित्तीं चिंती नाना काम, इच्छी धनसुत आराम, वितभर पोटासाठीं केवळ मांजर जैसें उंदीर देखुनि टपुनि बसुनि अति पिलगुनि करी पाऊल तैसें धनवंताचे द्वारीं केवळ हरि मानुनि निर्धारीं समान वारी मागत दीनवदन नृप सदन सधनिं निजरदन विचकितो जी महाराज अजी महाराज, अंजलिपुट जोडुनि लवुनि मिस्लित मिळुनि तॅस्लिम[4] करित परी आयुष्य सरतें बरवें हें उमजेना ॥ १

त्याला[5] परोपरीं ये राग, शीतें कांपवी जैसा माघ, उष्णें कोपे तीव्र निदाघ, फाडूं धांवे जैसा वाघ, तेथें कठोर वाक्य कुठार सोशी कीं चित्त सेवा हेचि असोशी वाटे म्हणवुनि इलु लु लु लु लु लु लु काम पुरेना, उलु कुलु लुलु लुलु करितो अनुदिनिं हळ हळ हळ हळ समागमावरी कळकळ कळकळ हृदयीं जळ जळ जळ जळ तळमळ पोटीं वचनीं वळवळ चळ चळ धन्यासि कांपे, घरांत कोपे, वश हो झोंपे, अळसें थोपे, शरीर चापे, परि हे सोपे, गुणानुवाद हरीचे नामप्रबंध गाउनि सत्वर सार्थक कांहीं करिना ॥ २

---

१. हाणावें, मारावें. २. परिणय=विवाह. पर्णुनियां=विवाह करून. ३. सीता. ४. सलाम. ५. श्रीमंताला.

पाहतां आत्मानात्म विचारीं, केवळ सच्चित्सुख अविकारी, म्हणवी मी देही अविचारी, शरीर मळमूत्राची मोरी; येथें ममता, ठेवुनि समता, विसरे रमतां, श्रमतां न धरी, बदरीनाथ न चिंतित कंदरीं[1], पदरीं पाप म्हणुनि रत उदरीं, नदरी सेवुनि, सदरीं बसतो, बरवा दिसतो, ऊर्जित पुसतो, मान न होतां घडि घडि रुसतो, आधीं गुंतुनि, लटिका कुंथुनि, त्यांतचि धसतो, जीवन्मुक्तहि असोनि उगाच, भवपंकीं फसतो, अहीमुखीं दर्दुरपाशा, माजीं दुराशा, योगें आमिषा, संधित जैशा, माशा कवळी, पाशाला अटकुनिही, महिशा नाशालागीं न समजे, अवकाशांतही आकाशात्म दे महेशालागुंनि न भजे, पाउस उन्हांत दुःखें कण्हत, चिखलीं झडांत, वांझेपरी देखत देखत, अमोल्य जीवित वेंचे, त्यांतुनि वृत्ति कदा फिरवेना. ॥ ३

करुनियां वर्ती मान, हिंडे दारोदारीं श्वान, इच्छित चित्तीं मानापमान, विषयांलागीं करी वण वण वण वण, आस्था मनांत, धन धन धन धन, आल्यावरी करी, फण फण फण फण, चण चण चण चण वचन बोलतो, खण खण खण खण रुपये मोजितो, पालखीमध्यें बसुनि धांवतो, पालखीसवें चरणीं धांवतो, अधिक हांव तो, धरुनि, मिरवी जगीं रूप नांव तो लटंबरातें वागवुनीयां, विटंबनेनें कुटुंब पोशी, आत्मा जो अविकार मूढ बेकार, म्हणवुनि हय शिकारबंद धरुनियां धांवे लग लग लग लग, न करी आचमन, आंहे[2]चमन, परमार्थसमयीं कैंचें ध्यान, स्त्रियेचें ध्यान, आत्मविषयीं तो अंधावृत्ति, बंध्या मोहरा, देखुनि विसरे, संध्या जाहली वंध्यापासुनि, देहसंबंध्यां लागुनि गौरवी, नकळे कैकाय, होउनि पुष्कळ पैका, असोनि पैका, पैका पैका पैका पैका, हें पुराण ऐकायाला स्वस्थ बसेना, मेघःश्याम चतुर्भुज आकृति, अनस्खलित कमनीय वदे, दर्शनीय पीतपट गोपबालिका, कृष्ण कालिका, करुनि मालिका, मिरविती त्यावरी वरदानीं विधियुक्त, विष्णूचें चिंतन नित्य करिना. ४

जेणें साधे इहपरलोक, त्या त्या करीत जड जग दोख, निरसे अज्ञानादिक शोक, अंतीं भासे जैसों वोक, ऐसा प्रसादकारक, जडजनतारक, दुर्मतिमारक, अतिसुखकारक, मूर्तिमंत नंदाचा नंदन, वृंदांचा वृंदावनवासी, वृंदारकजनवृंदवंद्य, श्रीमुकुंद सुंदर, कुंदरदन, मुचकुंदवरद, परम गोविंद, शरदिंदुवदन, श्यामवर्ण सुनासिक, सुनयन, अयन जगाचें, शेषशयन तो, चित्सुख

१. गुहेंत. २. मजा.

घन, शाश्वत, विश्वपाल, अमृतेश्वर वरदायक, नायक गावा ध्यावा हें समजेना. ॥ ९

## द्वादशमासवर्णन.[1]

(कार्तिकमासवर्णन.)

चिंतातुर राधा कामिनी । सांगे साजणी ॥ ध्रुवपद. ॥
पुण्यमास सये! कार्तिक, न्हाति जनलोक, विश्व करिति आनंद ।
षड्रस पक्वान्न भोजन कृष्णाकारणें[2] गाति नंदाचा नंद ॥
नानापरि धर्म करिती, दीप लाविती, नारींस[3] होय आल्हाद ।
हरि माझा स्वामि हो! मथुरेसी, मी तो परदेशी, मज वाटे खेद ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

परम कठिण काळीं राधिका रम्य बाळी,
चहुंकडे वनमाळी नेत्रबिंबें न्याहाळी ।
तदुपरि मृगनयनी वेधिली कामबाणीं,
विरहविकळ झाली राधिका कृष्णराणी. ॥ १

(मार्गशीर्षमासवर्णन.)

मार्गशीर्ष[4] धन्य आयिका, न्हाति बायका, पतिसेजे पहुडती ।
नानापरि भोगविलास, अति उल्हास, सुखगोष्टी करिती ॥
परस्परें गोडी आनंदें, बहु विनोदें, कैसी उभयतां प्रीति? ।
कृष्णरायें मज त्यजिलें, कां हो! रुसले? किती करूं मीं खंती[5] ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

कमलनयन कान्हा काय झालें कळेना?
यदुपतिविरहाची वेदना साहवेना ।
लवकर हरि आणा प्राण जाईल जाणा,
टकमक बघतां कां कृष्ण शोधूनि आणा. ॥ २

(पौष्यमासवर्णन.)

पौष्यमासीं पतिवियोग गमे क्षण युग, तयाविण क्रमेना[6] ।
विरहानल अति पेटला, जीव कष्टला, अंगीं दाह शमेना ॥

---

१. मदनशरहत राधेची कृष्णविरहानें बारा महिन्यांत कशी स्थिति झाली ती यांत वर्णिली आहे. २. 'विप्राकारणें' असा अन्य पाठ आहे. ३. स्त्रियांस. ४. 'मासानां मार्गशीर्षोऽहम्' असें भगवद्गीतेंत म्हटलें आहे. ५. दुःख. ६. करमेना, चैन पडेना.

दीननाथ! कां हो! कोपलां, कंठ शोषला, मज निद्रा कां येना? ।
करुं किती दुःख साजणी! नये आझुनी, माझी करुणा कां येना? ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

जळत जळत कुंडामाजि नेवोनि दंडा,
घळ घळ नयनाची धार तुम्ही विखंडा ।
ढळ ढळ निढळाशीं घाम कोठोनि येतो?
झुळ झुळ उदकाचा पूर कोठूनि जातो? ॥ ३

(माघमासवर्णन.)

माघमास आला गे साजणी! मी वो! विरहिणी, पति नाहिं शेजेसी ।
पूर्वी पापें मज घडलीं, तीं फळलीं, म्हणोनि विघडे यासी ॥
दारुण हें शीत वाजतें, मज पीडतें, कोण सांगे कृष्णासी ।
तूं वो! सखी माझि जिवलगा, आणिं श्रीरंगा, [1]चरण झाडीन केशीं ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

दहद दहद कुंडामाजि कोंडून दिल्हें
[2]फणिपतिशयनानें कां मला मो[3]कलीलें ।
म्हणुनि विकळ आंगीं राधिका ते शुभांगी,
धिक धिक जिव माझा कृष्णजीच्या वियोगीं. ॥ ४

(फाल्गुनमासवर्णन.)

फाल्गुन वसंत खेळती, जन हर्षती, माझें दुःख शरीरीं ।
धन्य धन्य गोडी आठवीं, कृष्ण भेटवीं, शेजे नाहीं मुरारी ॥
भरंवसा नाहीं या देहाचा, तरुणपणाचा, बहु झुरें अंतरीं ।
हरिविण काळ जातसे, श्रम होतसे, बोले राधा सुंदरी ॥ चिंता० ॥

श्लोक.

सुरस मधुर वाजे वेणु कोठें विचारा,
विकळ मि सखियांनो! धीर नाहीं शरीरा ।
तंव तिज सखि बोले, 'जो हरी वेणुनादें
त्रिभुवनमन तेव्हां मोहिलें नादछंदें.' ॥ ५

१. पायांवर डोकें ठेवीन–असा भाव. २. शेषशयनानें (कृष्णानें). ३. सोडिलें, त्यजिलें.

(चैत्रमासवर्णन.)

चैत्र मास उष्णकाळ, हा महा ज्वाळ, मज होय जाचणी[1] ।
जळाविण जैशि मासोळी, तैसी तळमळी, तेणें कष्टि मीं मनीं ।।
विरहानल अति पेटला, जीव कष्टला, सेजे नाहीं चक्रपाणी ।
विविधोपचार करितां, न सरे हो! व्यथा, नये कृष्ण अजुनी. ।। चिंता० ।।

(श्लोक.)

तळमळ करिताहे चैत्र वैशाख भारी,
हर हर सदनातें कोण आणी मुरारी? ।
जळु जळु जिव माझा, प्राण व्याकूळ झाला,
क्षण युग, जगदीशा! काळ हा व्यर्थ गेला. ।। ६

(वैशाखमासवर्णन.)

वैशाख शीतळ चांदणें, देहाकारणें, बहु उपचार केले, ।
कर्पूर चंदन चर्चिलें, तेंहि सूकलें, चर्चवीलें ।।
घननीळा हेममंचकीं सेज घातली, पुष्पें रेखिलीं ।
ये ना कृष्ण,............ बहु कष्टी मी झाली ।।
गोविंद सेजेसि नाहीं हो! करूं काय हो! कांहिं गोष्टि सूचेना ।
अखंड ध्यान हो तयाचें, स्मरण देवाचें, अजुनि आले कां ना? ।।
सेजेसि अंतर पडलें, म्हणुनि रूसले, कोणी प्रार्थुनी आणा ।
........................................................................ ।। चिंता० ।।

(श्लोक.)

हृदय जळत भारी, कंचुकी शीघ्र सोडा,
लवकर सखियांनो! कंठिंचा हार काढा ।
मदन पिडित भारी, थोर होतो उकाडा,
लवकरि मुळ[2] धाडा, कृष्ण आणा बिऱ्हाडा. ।। ७

(ज्येष्ठमासवर्णन.)

ज्येष्ठमास प्रीय तुम्हासी विवेक मानसीं होईल कैसें कळेना ।
चातकांस आस घनाची इच्छा मनाची दुःख कैसें साहेना ।।
मेघावीण मेदिनी[3] पिकेना, आशा पुरेना, जीव कैसा धरावा ।
हरिविण शून्य झालें हो! चैन गेलें हो! जाउनि कृष्णासी आणा.।। चिंता०।।

---

१. त्रास. २. आमंत्रण—बोलावणें पाठवा. ३. पृथ्वी.

(श्लोक.)

थरथर तनु कांपे पाठिशीं धीर द्या गे!
कळकळ करिताहे कोकिला व्यर्थ कां गे! ।
गरगर फिरताहे नेत्रबिंबेंहि दोनी,
परि हरिविण यांची वासना कोण मानी? ॥ ८

(आषाढमासवर्णन.)

आषाढ तृप्त हो मेदिनी चातकां ध्वनी आर्त[1] पुरवी तयांची ।
मजलागीं कैसे भेटती सुख तें देती ऐसी आशा मोठी मनाची ॥
राधेची मोठी हो! अवस्था चिंती भगवंता दासी होइन त्याची ।
म्हणते श्रीरंगा भेटवीं, इच्छा पूरवीं, सुख नाहीं जिवासी. ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

आतां जरी हरि नये तरि शस्त्रधारा, घेऊनियां तुम्हि करा मजलागिं मारा ।
ऐसा विलाप करुनी मग फार बोले, ऐकूनियां निजजना बहु त्रास झाले. ॥ ९

(श्रावणमासवर्णन.)

चिंता हो मनाची भेटि कृष्णाची होईल कैसि कळेना ।
हृदय वेधलें, श्रीहरी! तया सुंदरी कांहीं गोष्टि सूचेना ॥
अखंड ध्यान हो! तयाचें स्मरण देवाचें अजुनि आले कां ना! ।
शेजेसि अंतर पडलें म्हणूनि रूसले कोणी प्रार्थुनि आणा ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

धनधान्य सखी करिं घेई, दक्षिणा द्विजवरां[2] बहु देई ।
ज्योतिषास पुसती सखि बा गा, कृष्णनाथ कधिं येतिल सांगा. ॥ १०

(भाद्रपदमासवर्णन.)

भाद्रपदीं मोठी अवस्था, आणीं अनंता, नाना यत्न करुनी ।
तूं हो! माझी सखि सोयरी विनंति मी करीं माये! सांगातिणी[3]! ॥
ऐकूनि दूति चालली कृष्णासि बोलली विनवि जोडूनि पाणी[4] ।
राधेची अवस्था ऐकतां कृपा अच्युता, पक्ष्यीं[5] आले उडोनी ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

सारिका गजबजे बहु बोले, आंगणीं फिरत नाचत डोले ।
वामनेत्र[6] सखि कां लवतो गे, प्राणनाथ कधिं येतिल सांगें? ॥ ११

---

१. इच्छा. २. ब्राह्मणां. ३. निरोप नेणारी स्त्री. ४. हात. ५. पक्ष्यावरून, गरुडावरून. ६. डावा डोळा. स्त्रियांचा डावा डोळा लवणें हें शुभ चिन्ह आहे.

(आश्विनमासवर्णन.)

आश्विनीं नवरात्र आनंद, आले गोविंद, फार उत्साह झाला ।
चांफेल मर्दुनि षड्मार्जनें कृष्णाकारणें आरत्या ओंवाळिल्या ॥
भोजन सारुनि एकांतीं सुखें नीजती, राधा मनीं निवाली ।
अनाथ मी हरिनायिका, बोले त्र्यंबका, ऐसें········विश्वा कळलें. ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

हृदय जळत होतें साजणी शांत झालें,
सरस वदन चुंबें आंग माझें निवालें ।
हरिकर सखि बाई लागतां आजि आंगा,
तनु मन धन तेंही सर्व आलें उपेगा. ॥ १२

(अधिकमासवर्णन.)

अधिकमासीं बहु सोहाळा बोलसी बाळा कृपाळा ।
कृपा आली कृष्णासी येऊनियां राधा भोगिली, मनिं तोषला ॥
महाल्हाद झाला नाना प्रकारचीं वायनें विप्राकारणें ।
देत राधा सुंदरी, हर्षयुक्त राधा कामिनी सांगे साजणी. ॥ चिंता० ॥

(श्लोक.)

अधिकमास सखे गे! हीत माझें पुरे ना
क्षणभरि सखि बाई स्वामी सन्निध आणा ।
घडि घडि सखि बाई पाहतां तृप्ति हो ना
म्हणत अमृत हेंची वासना सांठवेना. ॥ १३

## अविनाशसंदेहहरण.

(ओंव्या.)

जय जय जगन्नाथा । तूं एक दाता अनंता आनंता । एकाएकीं ऐसे पाहतां । तोचि पाहणें. ॥ १ ॥ आतां नमूं ते शारदा । जे आदिशक्ति महाराजा । ब्रह्मतनया आदिबीजा । हंसवाहिनी. ॥ २ ॥ मग नमूं महासद्गुरु ।

१. या प्रकरणाच्या दुसऱ्या प्रतींत 'अधिकमासवर्णन' नसून 'आश्विनमासवर्णना'च्या शेवटील श्लोक असा आहे:—

बहुतचि सुख झालें अच्युतें भेट दिल्ही
तळमळ विरहाची पातकें सर्व गेलीं ।
सुदिन उगवला हा कृष्ण सेजेशि आला,
अमृत चरित वर्णी तत्पदीं लीन झाला. ॥

जो करी प्रपंचाचा संहारु । जयाचे कृपें निर्धारु । कळश रूपाचा. ॥ ३ ॥ ऐसिया सद्गुरूसी शरण । व्हावें कायावाचामन । मग निर्धारें प्रसन्न होऊन । दाखवी स्वरूप. ॥ ४ ॥ हा अवतार यादववंशीं । विश्वरूपा दाविलें अर्जुनाशीं । तैसेंच आदरें उद्धवाशीं । दाविलें स्वरूप. ॥ ५ ॥ येणेंच रीती पार्वतीप्रती । उपदेश केला पशुपती । आपुली दाविली स्वरूपस्थिती । हिमनगतनयेसी. ॥ ६ ॥ ऋषीवर्या ते शिरोमणी । जो वसिष्ठ महामुनी । तेणें दाशरथीलागोनि । बोधविलें. ॥ ७ ॥ ऐसेंच जी कपिलेश्वरें । ऋषिसिद्धाप्रति आदरें । स्वरूप दाविलें साचोत्कारें । निर्धारेसी. ॥ ८ ॥ सूतें शौनकादिकांप्रति । स्वरूप दाविलें स्वस्थिती । हेचि युगीं हेचि प्राप्ती । गुरुप्रसादें. ॥ ९ ॥ ऐसा हा सद्गुरुनाथ । पाहतां पाहावे तो समर्थ । हाची धरू निश्चयार्थ । निजमानसीं. ॥ १० ॥ सद्गुरूशी घालूं दंडवत । माझा प्रश्न तो पुरविता समर्थ । मज करूनि कृतकृत्यार्थ । तारावें जी ! ॥ ११ ॥ पांच अवस्था बोलिला वेद । हाची अर्थ वेद उपनिषद । शब्दींच दावील निःशब्द । हा ऐसा पैं. ॥ १२ ॥ अहो ! गुरुवर्यशिराणी । अवस्थाचे वर्णव्यक्ति दावा नयनपणीं । स्थानमात्रा कृपा करूनि । सांगा स्वामी ! ॥ १३ ॥ मग म्हणे श्रीगुरुनाथ, । 'बरवा प्रश्न केला समर्थ । तरी दावीन स्वरूप सत्य । निर्धारेंसी. ॥ १४ ॥ जागृति रक्तवर्ण औट हात । ऋग्वेद आकारमात्रा नेमस्त । स्थूळदेह हे समस्त । जाणावें तुवां. ॥ १५ ॥ स्वप्नावस्था श्वेतवर्ण । यजुर्वेद अंगुष्ठपर्वप्रमाण[1] । उकारमात्रा देह सूक्ष्म जाण । प्रत्यक्ष पैं. ॥ १६ ॥ सुषुप्ति अवस्था कृष्णवर्ण । सामवेद पर्वार्धप्रमाण । मकारमात्रा देह कारण । जाणिजे ऐसें. ॥ १७ ॥ तुर्या अवस्था नीळवर्ण । अथर्वणवेद मसुराप्रमाण । ईकारमात्रा देह महाकारण । देह ओळखे. ॥ १८ ॥ उन्मनी अवस्था पीतवर्ण । सूक्ष्मवेद ज्योतीरूप प्रमाण । ॐकारमात्रा व्यापक देह निर्वाण । एवं प्रणवपिंड. ॥ १९ ॥ ऐसा हा पंचांग प्रणवें । हाची वेदाधार अनुभवें । सच्चिदानंद स्वरूप जाणावें । सद्गुरुखुण. ॥ २० ॥ हाचि होय ऐसा निर्धारू । पार्था सांगे शार्ङ्गधरू । जो हा स्वरूप प्रकारू । लेबविला जी ! ॥ २१ ॥ परी काय सांगूं नवल थोर । प्रसन्न होऊनि कपिलेश्वर । ऋषिसिद्धा अनुग्रह सार । सांगे दश देह. ॥ २२ ॥ हें देखणें परम अवघडे । ज्यावरी सद्गुरुकृपा घडे । तरीच उकलेल हें कोडें । इतरां कां नेंडे[2] नुमजेची. ॥ २३ ॥

---

१. आंगठ्याच्या पेरायेवढा. २. न उकले.

मागें सांगितला विस्तार । पंचमुखें प्रणवप्रकार । सावध श्रोता होऊनि सादर । परिसीजे. ॥ २४ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण । हे चार देह झाले संपूर्ण । पांचवें व्यापक देह असे जाण । निजमानसीं. ॥ २५ ॥ आतां हेतुदेह सहावें । हेतु अवस्था जाणावें । अंगुष्ठपर्वप्रमाण ओळखावें । हृदयस्थानीं. ॥ २६ ॥ तेथिंची काय सांगूं शोभा । ज्योतिःस्वरूप पूर्णप्रभा । सद्गुरुवाक्य अमृतगर्भा । हाचि हा घनदाट. ॥ २७ ॥ याचे पाहतां स्थानक । पहातया पाहते हेची कौतुक । अनुभव पाहतां अलौकिक । वाटे परम. ॥ २८ ॥ पुढें सांगूं देह सातवें । निर्हेतु ऐसें जाणावें । निर्हेतुअवस्था स्वभावें । जाणिजे पैं. ॥ २९ ॥ देखणा गगनीं पूर्ण जळ। भरलें दिसे निर्मळ । अर्ध ज्योति केवळ । प्रमाण अनुअर्ध. ॥ ३० ॥ सांगूं उल्लेखदेह आठवें । उल्लेखअवस्था ऐसें जाणावें । स्वप्रकाशरूपीं भरावें । सोज्वळ शोभा. ॥ ३१ ॥ नववें देह अनुलेख । अवस्था देख । चतुर्थासी अनुओळख । प्रमाण ऐसें. ॥ ३२ ॥ या चतुर्थ अंशाभीतरी । शिखा दिसे अतिसुंदरी । तयेमध्यें स्वरूप झळस झळ करी । दिसे प्रत्यक्ष पैं. ॥ ३३ ॥ अखा नवाचे जालें बोलणें । परम सखोल गहन । सांगूं दाहवें परिपूर्ण । शून्यची होय. ॥ ३४ ॥ नवपर्यंत नवखंड । दाहावें काशीखंड । विश्वेश्वर हा प्रचंड । असे तेथें. ॥ ३५ ॥ तया नांव विश्वनाथ । नेत्राग्नि असे निश्चयार्थ । सद्गुरु भेटेल समर्थ । तरीच हे अकळे. ॥ ३६ ॥ या महाशून्याचा प्रकाशक । अकरावा श्रीगुरु ओळख । एकापुढें एक निष्टंक । ऐसा निष्कळंक शोभला. ॥ ३७ ॥ कोटिसूर्यांची एक प्रभा । कीं रत्नकीळीची दिसे शोभा । लखलखीत नयनगर्भा । माजी भरला असे. ॥ ३८ ॥ हाचि अंतरीं तोचिं बाहेरी । जैसा चंद्रसूर्याचिया हारी । व्यापिला दिसे चराचरीं । राजहंसापरि जैसा. ॥ ३९ ॥ हाची डोळां पाहतां । हाची श्रोत्रीं परिसतां । खपुष्पहि तत्वतां । तोच कीं. ॥४०॥ ऐसा देखणा श्रीगुरुदेवो । नासाग्रीं असे ऐसा वो । डोळां दिसे पाहा वो । स्वतः सिद्ध. ॥ ४१ ॥ ऐसें पाहाणें डोळियांसी । त्या माजी जो समरसी । पाहाता पहाणें घडे यासी । नयनाचा नयन होऊनि ठाके. ॥ ४२ ॥ जो नयनाचा नयन होय । आंत बाहेर तोची पाहे । परिपूर्ण भरूनि ठाय । देखणा होय निजांगें. ॥ ४३ ॥ चळ नसे तें अचळ । मळ नसे तें निर्मळ । परम सोज्वळ । दिसे वो ! हा. ॥ ४४ ॥ शुद्ध जैसी स्फटिक शिळा । चंद्रकांति प्रभा अगळा । ऐसा हा लखलखिला सोज्वळा । तेजोमय. ॥ ४५ ॥ सूर्यकोटिप्रकाश एकवटला । कीं चंद्रकोटिप्रकाश फांकला । ऐसा शुभ्र तेजें

शोभला । तेजोराशी. ॥ ४६ ॥ सकळ तेजें एका सरसीं । केलिया होय तेजोराशी । ऐसीया परब्रह्म मूर्तीसी । धरी प्राणेसी निजभावें. ॥४७॥ तोची सच्चिदानंद सर्वांगीं । व्याप्त असोनियां जगीं । न दिसे अज्ञान दृष्टीलागीं । ज्ञानयोगियां दृश्य होय. ॥ ४८ ॥ सद् म्हणजे अस्ति आहे । चिदत्वें भ्रांति भास पाहे । आनंद हा प्रेम लाहे । सच्चिदानंद पाहे निजात्मा. ॥ ४९ ॥ जैं सद्गुरूचि होय भेटी । त्याचिये चरणीं पडे मिठी । तैं सच्चिदानंद त्रिपुटी । ज्ञानदृष्टि दृश्य होय. ॥ ५० ॥ अहं सद्तत्वें जीव बोले । सोहं चिदत्त्वें शिव चाले । आनंद ऐकस्वलीळें । अखिल खेळे डोळां पाहा. ॥ ५१ ॥ ऐसा सच्चिदानंद प्रकाश डोळां । तेणें प्रकाशे सृष्टीस कळा । ज्ञानदृष्टी होय उजळा । गुरुकृपाळु देखोनियां. ॥ ५२ ॥ देह अहंतेजो भुलला । माया ममतेनें व्यापिला । अज्ञान पडदे सांकोळला । जवळी ओळखिला नव जाये. ॥ ५३ ॥ जैसा सूर्य माध्यान्हासी येतां । किरणें दृष्टी न पाहवे सर्वथा । तेंवी आत्मसूर्य प्रकाशतां । न दिसे तत्वता अज्ञान दृष्टी. ॥ ५४ ॥ या अज्ञानासीहि गुरु भेटे । डोळां झांकोनिया बोटें, । आत्मसूर्य दावी नेहटे । कृपाळु सदय सद्गुरुराव. ॥ ५५ ॥ अज्ञान चर्म दृष्टीसी । आच्छादूनि निज करासी । ज्ञान दृष्टी स्वयं प्रकाशी । देखे भानूसी प्रत्यक्ष. ॥ ५६ ॥ डोळा नसतांहि पाहणें । श्रवण नसतां ऐकणें । घ्राण नसतां सुगंध घेणें । जिव्हेविणें रस चाखे. ॥ ५७ ॥ चरणाविण चालणें । हस्ताविण घेणें देणें । गुदेंविण मळ विसर्जन करणें । रतीविण भोगणें भोग. ॥ ५८ ॥ ऐसा अनुभव न जाणतां । वृथा करिती इंद्रियांची वार्ता । जो तयाचा अधिष्ठिता । तो सहज तत्त्वता निजात्मा. ॥ ५९ ॥ तरी ऐसें जें कां लक्षण । तें सहज जाणावें विचक्षण । गर्भांधाचें जेंवि पाहणें । केलें खंडण या शब्दें. ॥ ६० ॥ नाश झाला म्हणे डोळा । तरी डोळा राहे तो निराळा । दश दिशा प्रकाश कळा । तया डोळा प्रगट दिसे. ॥ ६१ ॥ तो निज डोळा अविनाश । तया कैसा असे नाश । संशय न धरावा निःशेष । धरावा विश्वास सद्बुद्धि. ॥ ६२ ॥ पर्वतमस्तकीं पडती वज्रें । तेणें छिन्न विच्छिन्न होती गात्रें । तेंवि मद्वाक्य वज्र शस्त्रें । छेदा संशय दुर्बुद्धि. ॥ ६३ ॥ ऐसीया प्राप्तीकारणें । करिती हटयोग साधनें । परि नकळे निधान । जवळीं असतां. ॥ ६४ ॥ एक कल्पवरि ऊर्ध्वगती । आत्मा ब्रह्मांडासी नेती । ऐसे समाधिस्थ होती । हटयोगी जे. ॥ ६५ ॥ नानापरीचे अभ्यास । करितां कष्ट होय बहुवस । तैसें नोव्हे या मार्गास । राजयोग अति सोपा. ॥ ६६ ॥ गुरुपदीं ठेऊनि विश्वास । भोगावा हा योग राजस । प्रपंच होय परब्रह्मास । न लगतां तत्क्षणें. ॥ ६७ ॥

राजयोग श्रवण होय । राजयोग डोळां पाहे । राजयोग सुगंध वाहे । घ्राणामाजी राहे निरंतर. ॥ ६८ ॥ माझिया डोळां सद्गुरु । अखंड असे स्थिरु । जेणें हा विश्वंभरु । विश्वाकार दिसे पैं. ॥ ६९ ॥ कृतकृतार्थ जी! दयाळा! । अगाध पूर्ण तुमची लीळा । अहंभाव आमचा गळाला । दीन-दयाळा गुरुवर्या! ॥ ७० ॥ जयजयादि जगदादिकंदा । जयजयाजी अलक्ष-भेदा । जयजयाजी निजबोधा । सच्चिदानंदा गुरुवर्या. ॥ ७१ ॥ जयजयाजी परात्परा । परमपुरुषा दिगंबरा । परमानंदपरिकरा । नाहीं पारा तुझिया. ॥ ७२ ॥ सद्गुरु! तूं आम्हांसी । प्रसन्न झालासी प्रबोधासी । हारूनि आमुच्या जिवासी । स्वानंदपदासी दीधलें. ॥ ७३ ॥ नवल सद्गुरूनें केलें । माझें अ-ज्ञानत्व हारिलें । ऐसें हें स्वरूप दाविलें । निजडोळा. ॥ ७४ ॥ हृदयीं ज्योति स्थिर । प्रत्यक्ष होय दृष्टिगोचर । पद्मगर्भी पाहे नर । तो मुक्त निर्धारें संशय नाहीं. ॥ ७५ ॥ नेत्र पद्मगर्भ पोटीं । ज्योति प्रत्यक्ष दिसे दृष्टी । ते हृदय-स्थानसंपुटि पाहे स्वानंद पोटी । तोचि मुक्त. ॥ ७६ ॥ स्वामीचे प्रसादें करून । आम्हा झालें आत्मज्ञान । साक्षात्कारें स्वरूपदर्शन । तुमचे नयनें देखिलें. ॥ ७७ ॥ अनिर्वाच्य स्वरूप जाण । ते अनुभविली निजखूण । अ-गाध कृपा तुमची पूर्ण । आत्मा देखियला नयनीं. ॥ ७८ ॥ आतां असो हा अनुभवप्रकार । परंपरा सांगों जी निर्धार । शृंगेरीमठ साचार । तेथें अधिष्ठान सरस्वती. ॥ ७९ ॥ तोचि सांप्रदाय माधवसरस्वती । वास गोदातीरनाभी-तीर्थी । असतां अनुग्रह प्राप्ती । विठ्ठलसरस्वतीसी. ॥ ८० ॥ मग तयाचा उपदेश । प्राप्त अंबिकासरस्वतीस । तयाचा अभयकर अमृतास । असे सत्य. ॥ ८१ ॥ श्रोता करील अनुमान । म्हणेल पिढ्या सात नसेल पूर्ण । तरी साक्षेप केलें कथन । क्षमा संतीं मज कीजे. ॥ ८२ ॥ तरी पुन्हां सांगों सा-चार । जे परंपरा असे पूर्वापार । तेची सांगूं जी गंभीर । ऐकतां कर्णी मन निवे. ॥ ८३ ॥ आदिगुरु श्रीउमापती । तेथून विष्णु उत्पत्ति । तया प्र-जापती । शिष्य होय. ॥ ८४ ॥ यापासोन वसिष्ठमुनीश्वर । तेथूनियां पारा-शर । याचा अभयकर । श्रीव्यासदेवासी. ॥ ८५ ॥ व्यासापासून शुकदेव । तेथून गौडपादा उगव । मग शंकराचार्य । वैभव प्रगटलें. ॥ ८६ ॥[1]

१. 'शके १७७१ सौम्यनाम संवत्सरे ऊर्फ वैशाख वद्य ३० रोज भोम्वार' असा लेख-काचा समाप्तिलेख आहे.

# अमृतराय.



कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा; ।
भलत्या मुखांतुन अशी सुरसखनि निघेल काय जी! वाचा? ॥

मोरोपंत–'सन्मणिमाला.'

प्रत्येक कवीचे समग्र ग्रंथ छापून झाले म्हणजे त्या कवीविषयीं जी माहिती मिळ-
ारखी असेल ती मिळवून वाचकांस सादर करावी, असा आम्ही संकल्प केला आहे.
ा अनुसरून अमृतरायाची जितकी कविता उपलब्ध झाली आहे, तितकी छापून
द्ध केली आहे. आतां त्याच्या संबंधानें जी माहिती उपलब्ध आहे, ती येथें दे-
चा विचार आहे.

जीवनवृत्त–अमृतराय हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होता. ह्याचें जन्म शालि-
न शके १६२० मध्यें बहुधान्य संवत्सरीं झालें. हा बिडाजवळील एका खेड्यांत
त असे. मोंगलाच्या पदरीं विसामोरो म्हणून एक मुत्सद्दी होता, त्याच्याकडे नो-
असल्यामुळें यास मुख्यतः औरंगाबादेस राहावें लागे.

असें सांगतात कीं हा कांहींसा थट्टेखोर असल्यामुळें ह्यानें एकदां मध्वमुनी म्हणून
साधु होते त्यांची थट्टा केली. तीवरून मध्वमुनीश्वर त्यास यत्किंचित्‌हि रागें न
ां एवढेंच म्हणाले कीं, 'तुला परमेश्वरानें अमृतासारखी वाचा दिली आहे,
ाय आईबापांनींही तुझें नांव अमृतराय असें ठेविलें आहे, असें असतां त्या
ाचा तूं असा उपयोग करावास हें योग्य नाहीं.' हें स्वामीचें बोधपर भाषण
ा त्यास पश्चात्ताप झाला, व तेव्हांपासून यानें आपल्या वाणीचा चांगला उपयोग
याचा निश्चय केला. एखादा पर्वत आड आल्यानें जशी नदीच्या जलौघाची
ा बदलते, तशीच अमृतरायाच्या जीवनयात्रेची दिशा या गोष्टीनें बदलली, असें
ें पाहिजे.

अमृतरायाच्या वृत्तींत असा पालट झालेला पाहून मध्वमुनीश्वरस्वामींनीं त्यास
े गुरु अद्वैतानंद यांजकडून अनुग्रह करविला–अशी दंतकथा आहे, परंतु ती
नसावी असें वाटतें. यास प्रमाणः–'अविनाशसंदेहहरण' नामक प्रकरणांत
आपली गुरुपरंपरा दिली आहे. व आपल्या गुरूचें नांव 'अंबिकासरस्वती' होतें
दर्शविलें आहे. तसेंच 'ध्रुवचरित्रा'च्या शेवटीं (पृ० १४ श्लो० २०) आपल्या
पितरांचीं नांवें सांगून 'अंबाजिता अमृत पावन नाम ज्याला' असा आपल्या
या नांवाचा उल्लेख केला आहे. तसेंच पृष्ठ १०१ पद १० चरण ३ यांत

# अमृतराय.

कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा; ।
भलत्या मुखांतुन अशी सुरसखनि निघेल काय जी! वाचा? ॥

**मोरोपंत**–'सन्मणिमाला.'

प्रत्येक कवीचे समग्र ग्रंथ छापून झाले म्हणजे त्या कवीविषयीं जी माहिती मिळ-ण्यासारखी असेल ती मिळवून वाचकांस सादर करावी, असा आम्ही संकल्प केला आहे. त्यास अनुसरून **अमृतरायाची** जितकी कविता उपलब्ध झाली आहे, तितकी छापून प्रसिद्ध केली आहे. आतां त्याच्या संबंधानें जी माहिती उपलब्ध आहे, ती येथें दे-ण्याचा विचार आहे.

**जीवनवृत्त**–अमृतराय हा देशस्थ आश्वलायन ब्राह्मण होता. ह्याचें जन्म **शालि-वाहन शके १६२०** मध्यें **बहुधान्य** संवत्सरीं झालें. हा **बिडाजवळील** एका खेड्यांत राहात असे. **मोंगलाच्या** पदरीं **विसामोरो** म्हणून एक मुत्सद्दी होता, त्याच्याकडे नो-करी असल्यामुळें यास मुख्यत: **औरंगाबादेस** राहावें लागे.

असें सांगतात कीं हा कांहींसा थट्टेखोर असल्यामुळें ह्यानें एकदां **मध्वमुनी** म्हणून एक साधु होते त्यांची थट्टा केली. तीवरून **मध्वमुनीश्वर** त्यास यत्किंचित्‌हि रागें न भरतां एवढेंच म्हणाले कीं, 'तुला परमेश्वरानें अमृतासारखी वाचा दिली आहे, शिवाय आईबापांनींही तुझें नांव अमृतराय असें ठेविलें आहे, असें असतां त्या वाणीचा तूं असा उपयोग करावास हें योग्य नाहीं.' हें स्वामीचें बोधपर भाषण ऐकून त्यास पश्चात्ताप झाला, व तेव्हांपासून यानें आपल्या वाणीचा चांगला उपयोग करण्याचा निश्चय केला. एखादा पर्वत आड आल्यानें जशी नदीच्या जलौघाची दिशा बदलते, तशीच **अमृतरायाच्या** जीवनयात्रेची दिशा या गोष्टीनें बदलली, असें म्हटलें पाहिजे.

अमृतरायाच्या वृत्तींत असा पालट झालेला पाहून **मध्वमुनीश्वरस्वामींनीं** त्यास आपले गुरु **अद्वैतानंद** यांजकडून अनुग्रह करविला–अशी दंतकथा आहे, परंतु ती खरी नसावी असें वाटतें. यास प्रमाण:–'अविनाशसंदेहहरण' नामक प्रकरणांत त्यानें आपली गुरुपरंपरा दिली आहे. व आपल्या गुरूचें नांव 'अंबिकासरस्वती' होतें असें दर्शविलें आहे. तसेंच 'ध्रुवचरित्रा'च्या शेवटीं (पृ० १४ श्लो० २०) आपल्या मातापितरांचीं नांवें सांगून 'अंबाजिता अमृत पावन नाम ज्याला' असा आपल्या गुरूच्या नांवाचा उल्लेख केला आहे. तसेंच पृष्ठ १०१ पद १० चरण ३ यांत

'अंबा फळला'=अंबिकासरस्वती फळ देता झाला—असें म्हणून आपल्या गुरूच्या नांवाचा उल्लेख केला आहे. आतां मध्वमुनीश्वर मात्र अमृतरायाचा समकालीन असून त्याच्या उपदेशानें त्यास उपरति झाली असावी, व पुढें त्यानें अंबिकासरस्वती-पासून उपदेश घेतला असावा, असें म्हणण्यास कांहीं बाध येत नाहीं. हा अंबिकासर-स्वती श्रीशंकराचार्यांच्या शिष्यपरंपरेपैकीं एक साधु होता.

अमृतराय गुरूपदेश घेतल्यावर सर्व कामकारभार सोडून कीर्तन करूं लागला. कीर्तनामध्यें कथासंदर्भास अनुरूप अशी कविता तात्कालिक स्फूर्तीनें करून म्हणत असे. तो कडकडीत वैराग्यानें राहात असे. त्याच्या वैराग्याबद्दल एक आख्यायिका आहे ती अशीः—

'वैराग्यभाग्यासारिखें भाग्य नाहीं' हें अमृतरायानें केलेलें पद आहे. (पृ० ४८ पद ११३ पहा.) त्याची तेव्हां लोकांत बरीच प्रसिद्धि झाली. तें एका बैराग्याचे कानीं आलें. तेव्हां स्वतः अमृतरायाचें प्रेम वैराग्यावर किती आहे हें प्रत्यक्ष पहावें म्हणून तो औरंगाबादेस आला. पाहतो तों अमृतराय तर मोटा झांकदार पोषाक करून झोंपाळ्यावर बसले आहेत, व खुशाल झोंपा घेत आहेत. तें पाहून बैराग्यानें अमृतरायास विचारिलें कीं, 'वैराग्यभाग्यासारिखें भाग्य नाहीं' हें पद आपलेंच ना! अमृतरायानें 'होय' म्हणतांच बैराग्यास राग आला. तो म्हणाला, 'बोलणें सोपें पण करणें फार कठिण आहे. आपण भाग्याचा उपभोग खुशाल घेऊन लोकांस वैरा-ग्याचा उपदेश करावा, यांत फायदा तो कोणता?' अमृतराय म्हणाले, 'हें देहप्रारब्ध आहे.' बैरागी म्हणाला, 'ठीक आहे. आपलें देहप्रारब्ध आपल्याबरोबर आहेच. आपण माझ्याबरोबर वनवासास चलावें.' अमृतराय म्हणाले, 'फार चांगलें.' पुढें तो गोसावी व अमृतराय औरंगाबाद सोडून लांब एका निर्जन वनांत आले. जेथें वनांत चिटपांखरूंही नाहीं अशा ठिकाणीं अमृतरायास बसवून आपण गांवांत भिक्षा मागण्यास निघून गेला. इकडे अमृतरायाचा एक शिष्य मोठा सरकारी कामदार होता, तो त्या मार्गानें येत होता. त्यानें अमृतरायास पाहतांच तेथें मुकाम केला, व अमृतरायास चाकरांनीं मऊ परांच्या गादीवर निजविलें व ते त्याचे पाय चेपूं लागले. इतक्यांत गोसावीबोवा भिक्षेहून आले. पाहतात तों अमृतरायाचा निराळाच थाट! तो पाहतांच अमृतरायाचें भाषण त्यास खरें वाटलें. मग तो अमृतरायाचें शिष्यत्व पतकरून त्याच्या आज्ञेनें निघून गेला.

अमृतरायाचें कीर्तन फार रसाळ होतें असें मोरोपंताच्या वर्णनावरून स्पष्ट होतें. श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनीं याचें कीर्तन करविलें होतें, व कीर्तन ऐकून ते फार खूष झाले अशी लोकप्रसिद्धि आहे.

याच्या आईचें नांव उमा, व बापाचें नांव शंकर (ध्रुवचरित्र–पद्य २० पृ० १४ पहा) होतें. याहून जास्त माहिती उपलब्ध नाहीं.

याचें देहावसान शके १६७५ चैत्र शुद्ध ६ श्रीमुखनाम संवत्सरीं झालें. याचें वय मरणसमयीं ५५ वर्षांचें होतें.

**कवितासंग्रह**–अमृतरायकृत जीं काव्यें आमच्या संग्रहीं होतीं, व जीं आमच्या रसिक सन्मित्रांनीं आस्थेनें शोध करून मिळवून आमच्याकडे पाठविलीं, त्या सर्वांचें प्रकाशन करून तीं आमच्या वाचकांस अर्पण केलीं आहेत. अमृतरायाची कविता फारशी नाहीं. आहे तींतही सबंध आख्यानें फार थोडीं आहेत. वर्णनपर कविता फ़ार आहे. कटिबंधापैकीं 'शुकचरित्र,' 'ध्रुवचरित्र,' 'सुदामचरित्र' हे फार मोठे आहेत. व यांत कवीचें चातुर्य दृष्टीस ढळढळीत पडतें. अमृतरायाची एवढीच कविता जरी वाचून पाहिली, तरी त्याच्या कवितेंतले प्रसादादि गुण नजरेस पडल्याशिवाय रहावयाचे नाहींत. 'दामाजीचरित्र' हें प्रकरणही बरेंच मोठें आहे, व सरसही आहे. सुरेखसें कथानक निवडून काढून त्यावर काव्य लिहावें, असा कवींचा संप्रदाय साधारणतः असतो; परंतु कालिदासासारख्या कवींस कथानक निवडण्याची गरज लागत नाहीं. कुबेरानें यक्षाला शाप दिला, तो अरण्यवासास गेला व त्यानें मेघाबरोबर आपल्या स्त्रीस निरोप पाठविला; एवढ्याशा कथानकावर आमचे कविकुलगुरु 'मेघदूता'सारखें सुमनोहर काव्य तयार करितात! तसाच कांहींसा प्रकार अमृतरायाचा आहे, असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. 'ध्रुवचरित्र,' 'शुकचरित्र' हीं म्हणजे मोठीं निवडक कथानकें आहेत असें नव्हे, पण तींच प्रकृत कवीस आपली प्रतिभा किती उज्ज्वल आहे हें दाखविण्यास पुरलीं! वर्णनपर कटाव बरेच आहेत, परंतु ते लहान लहान आहेत. पदें अनेक विषयांवर आहेत. कांहीं भक्तिपर आहेत, कांहीं उपदेशपर आहेत, कांहीं प्रासंगिक आहेत. आणखीही पुष्कळ कविता न मिळालेली अशी असण्याचा बराच संभव आहे. प्रकृत कवीनें हिंदी भाषेंत 'रुक्मिणीस्वयंवर' रचिलें आहे, असा सर्वतोमुख लोकप्रवाद आहे; परंतु तें अद्याप उपलब्ध झालें नाहीं, हें दुर्भाग्य होय.

**सरणी**–अमृतरायाची वाणी अमृतलहरीसारखी सुधास्राविणी आहे. मराठी भाषेंतील उच्च प्रतीच्या कवींत त्याची गणना करण्यास कांहीं हरकत नाहीं. याची कविता प्रासप्रचुर असल्यामुळें ती नुसती ऐकणारासही गोड वाटते, मग जो अर्थाकडे दृष्टि देऊन ती वाचील तो तन्मय झाला म्हणून काय नवल! प्रकृत कवीनें कर्णमधुर कविता केली आहे तरी उगीच क्लिष्टपणा येईल अशी रचना कोठेंच आढळत नाहीं. वर्णनास एकदां आरंभ झाला म्हणजे त्यांत योग्य ठिकाणीं योग्य शब्दयोजना

व्हावयाचीच, असें पाहून त्याच्यापुढें मराठीभाषा हात जोडून उभी असावी असें वाटतें. त्याचें जन्म औरंगाबाद येथें झालें असल्यामुळें त्या शहरांतलें अपारवैभव, आणि यवनांचा इष्कबाजपणा त्याच्या मनांत प्रतिबिंबित झालेला दिसतो. त्यामुळें त्याच्या वर्णनास अनेकस्थळीं दिलदारपणा व झोंकदारपणा आला आहे. मराठी भाषेप्रमाणेंच हिंदीभाषा त्याला अवगत असल्यामुळें त्याची दोन्ही भाषांतील कविता सारखी रसाळ आहे. अमृतरायाची कविता कडाका छंदांत आहे. तरी साकी, दोहा, घनाक्षरी इत्यादि वृत्तांतही त्याची कविता आहे. थोडेसे श्लोक आहेत. पैकीं कांहीं श्लोकांत (पृ० ९७ पहा) वर्णन केल्याप्रमाणेंच प्रकृत कवीची अर्धांगी असली (कदाचित् तें सामान्यत्वेंकरून स्त्रियांचेंही वर्णन असेल) तर ती त्यांच्या वैराग्यवृत्तीस उत्तेजन देणारीच होती असें म्हटलें पाहिजे. प्रसंगानुरूप वर्णन करण्यांत कवीचा किती हातखंडा आहे हें पहावयाचें असल्यास 'गणपतिवर्णन'–कडवें २; 'ध्रुवचरित्र'–कडवीं ४,५; 'शुकचरित्र'–कडवीं १,२,३,९; 'सुदामचरित्र'–कडवीं १,२, ४,६; 'भीष्मप्रतिज्ञा' इत्यादि स्थळें पाहावीं. अमृतरायाच्या काव्यांत प्रसादगुण विशेष आहे. भक्तिरस ओतप्रोत भरला आहे. कटावांत प्रासानुप्रासांची गर्दी दृष्टीस पडते, तरी ती ओढून ताणून आणलेली आहे असें दिसत नाहीं. कवीची स्वाभाविक रचनापद्धति तशी असावी असें वाटतें. पदें अगदीं साधीं आहेत, तरी त्यांत हृदयंगमत्व नाहीं असें नाहीं. मुक्तेश्वराचें महाभारत वाचूं लागलें म्हणजे रसिक डोलतच राहतात; परंतु 'कौतूहलरामायण' वाचूं लागतांच त्यांची निराशा होते. तसें अमृतरायाचें नाहीं. जो रंग कटिबंधांत आहे, तोच रंग 'दामाजीचरित्रां'त आहे; आणि तोच रंग 'देव तो रे! तो रे!' अशा किरकोळ पदांतही आहे. ही गोष्ट कांहीं लहान नाहीं. 'दामाजीचरित्र' करुणरसानें ओथंबलें आहे. विठ्ठलानें विठ्या महाराचें रूप घेतलें याचें चित्र कवीनें रेखिलें आहे, त्यापेक्षां कोणता कल्पक चित्रकार अधिक चेतोभिराम चित्र काढील? विठ्या महाराचें बोलणें ऐकून बादशाहा बादशाही सोडून वेडा झाला म्हणून नवल तें काय? प्रसाद पहावयाचा असल्यास पद ९,२२,४८,११३ इत्यादि पहावीं. वैराग्याबद्दल तर कवीनें जागोजाग मार्मिक वर्णन केलें आहे. (पदें ११२,१२१,१२२ इत्यादि पहा.) अमृतरायाचा उपदेश मनावर ठसा उठविण्यासारखा असून फारच सौम्य शब्दांनीं गुंफिलेला आढळतो. (पदें ४०,४५,५०,५९,६०, ६१,७० पहा.)उगीच कोरडे ओढिले आहेत असें नाहीं. यामुळें अमृतरायाच्या कीर्तनाचा परिणाम श्रोत्यांच्या मनावर फार उत्तम घडत असेल, असें अनुमान करण्यास जागा आहे. उपदेशाचा हा प्रकार ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. मनास पाझर आणून वर्ण्यविषय श्रोत्यांच्या मनांत भरवून देण्याची कला अमृतरायास चांगलीच साधली होती. (पदें ११२,१२१,१२२ इत्यादि पहा.)

प्रकृत कवीची कविता दिसण्यांत जरी थोडी दिसते तरी छंद मोठा असल्यामुळें तींत अनेक विषय येऊन गेले आहेत. संस्कृतांत **'बाणोच्छिष्टं जगत्सर्वम्'** अशी म्हण आहे, त्यासारखाच प्रकृत कवीचाही प्रकार दिसतो. याच्या काव्यांत अनेक प्रकार अनेक ठिकाणीं येऊन गेले आहेत. 'शुकचरित्रां'त गर्भवासाचें दुःख, अनेक जन्म, पापपुण्याचीं फळें, यांचें वर्णन आहे. 'सुदामचरित्रां'त कृष्णाच्या अपरिमित भाग्याचें व सुदाम्याच्या दारिद्र्याचें वर्णन आलें आहे. 'राधावर्णनां'त अनेक अलंकारांचें वर्णन आहे. 'कृष्णलीलें'त कृष्णाच्या बाळलीलांचें व चटोर पोरांचें वर्णन आलें आहे. 'द्रौपदीवस्त्रहरणां'त अनेक तऱ्हेच्या आणि अनेक ठिकाणीं त्या काळीं उत्पन्न होणाऱ्या वस्त्रांचें वर्णन आलें आहे. 'जीवदशावर्णनां'त गर्भवासादि दुःखांपासून अपार वैभवाच्या शिखरावर पोंचेपर्यंतचें वर्णन आहे. शिवाय वेगळालीं अनेक प्रकारचीं वर्णनें अन्यत्र आहेतच. या अपूर्व अनेक प्रकारांच्या सन्निवेशामुळें अमृतरायाची कविता वाचणारास नुसता काव्यरसपानाचाच लाभ घडतो असें नाहीं तर त्या वेळच्या देशस्थितीचें, रीतीभातींचें, आचारविचारांचें, ऐतिहासिक दृष्टयाही ज्ञान होण्यासारखें आहे.

अमृतरायाच्या काव्यांत प्रसंगविशेषीं शृंगार, वीर, हास्य, बीभत्स इत्यादि रसही अंगभूत आहेत. 'शुकचरित्रां'त शृंगार व वैराग्य यांचा मासला पहावयास सांपडेल, वीररस 'भीष्मप्रतिज्ञे'त आढळेल, 'नारदी' व 'सुदामचरित्र' यांतील वर्णनचमत्कार हे हास्यरस उत्पन्न करण्यासारखे आहेत व 'वेडा तामसा जोगी' हें साधेंसें पद बीभत्सरसाचें मूर्तिमंत उदाहरण होय.

**भाषा**—अमृतरायाची भाषा साधी, सरस व प्रौढ आहे. तींत शब्दांचीं वेडीवांकडीं रूपें केलेलीं फारशीं नजरेस येत नाहींत. अमृतरायास हिंदीभाषा किती चांगली येत असे हें सांगावयास त्यानें तींत मराठीसारखीं सरस कवनें केलीं आहेत एवढें सांगणें पुरे आहे. संस्कृताचें ज्ञानही त्यास चांगलें असावें असें त्याच्या भाषापद्धतीवरून दिसतें. त्यानें श्रीमद्भागवत, रामायण, भारत, काशीखंड, मार्कंडेयपुराण, योगवासिष्ठ इत्यादि ग्रंथ वाचले असावे असें त्याच्या कवितेवरून दिसतें.

लेखकपरंपरेनें घडत आलेले प्रमाद व संस्कृतहिंदी या भाषांची मिसळ यांमुळें त्याची सर्व कविता लावण्यास सुलभ नाहीं. अमृतरायाची भाषा सर्व काव्यांत सारखी नाहीं; कोठें गीर्वाणवाणीच्या संगतीनें प्रौढ बनलेली, कोठें हिंदीच्या सहवासानें झोंकदार झालेली, कोठें साध्या रूपानें प्रकट होणारी—आहे. या वैचित्र्यामुळें ज्या प्रकारचा वाचक असेल त्या प्रकारचें रूप धरून ती करमणूक करणारी आहे. याच कारणानें ती आबालवृद्धांस संतोष करणारी आहे. कोणी 'मुंडमथन करि जननिजनक

निजरुंडमालधर' यांत रममाण होईल, तर कोणी 'तमाम ऐने काम मुलाथम' यांत गुंगेल; कोणी तर 'देव भेटेल कैसा ? । आग्रह हो जरि ऐसा' इत्यादि साध्या कवनांत आनंद मानील. इतर कवींच्या कविता भिन्नभिन्न रसांच्या आवडीप्रमाणें भिन्न भिन्न ठिकाणीं रुचिकर होतील परंतु अमृतरायाचें तसें नाहीं. त्याची वाणी कोणासही अमृतरसाच्या पानानें संतुष्ट करून सोडिल्याशिवाय राहणार नाहीं. नुसतीं 'प्रभाती' या नांवाखालीं मोडणारीं पदें (पृ० १४३-१४५) जरी कोणीं एखाद्या साध्या गायकाकडून ऐकिलीं तरी तो अमृतरायाच्या काव्यमकरंदावर मिलिंदायमान होऊन जाईल अशी आमची पक्की खातरी आहे.

अमृतरायास उर्दू, आरबी व फारशी या भाषांचेंही चांगलें ज्ञान असावें असें त्याचें 'सुदामचरित्र' (पृ० ७६-८३), 'पूतनावधाख्यान' (पृ० ७४-७६) इत्यादि प्रकरणें वाचलीं असतां म्हणण्यास कांहीं हरकत आहे असें वाटत नाहीं.

**विद्वत्ता**—अमृतरायाला मराठी, संस्कृत, हिंदी, फारशी, आरबी व उर्दू भाषा येत होत्या हें वर सांगितलेंच आहे. व्यवहारांत त्याचें चांगलें लक्ष्य असल्याशिवाय हुबेहुब वर्णनें उठवतां येतील हें तर म्हणावयासच नको. अनेक ठिकाणची जी माहिती त्यानें आपल्या कवितेंत गोविली आहे, ती बहुश्रुतपणाशिवाय प्राप्त होण्यासारखी नाहीं. हिंदीभाषा त्यास कशी करतलामलकवत् होती हें त्याच्या हिंदी कवितेवरून कळण्यासारखें आहे. संस्कृत भाषेचें ज्ञान किती होतें हें 'ध्रुवचरित्रां'तील चूर्णिका वाचल्यानें कळून येईल. मराठीविषयीं तर बोलावयासच नको; कोणताही कटाव वाचला असतां त्याचें वर्णनचातुर्य आणि महाराष्ट्रभाषानैपुण्य सहज लक्षांत येईल. आतां याच्या कवितेंत दोष अगदीं नाहींत, असें नाहीं. परंतु असले तर ते फारच कमी आहेत. एका संस्कृत कवीनें म्हटलें आहे कीं 'एको गुणः खलु निहंति समस्तदोषान्' एक गुण असला तर सर्व दोष नाहींसे होतात; पण प्रकृत कवीच्या कवितेंत गुणांचें पारडें खालींच बसेल; यांत शंका नाहीं. कोठें ऱ्हस्वाचें दीर्घ, दीर्घाचें ऱ्हस्व, अप्रशस्त समास, ग्राम्य शब्द इत्यादि दोष त्याच्या कवितेंत मधून मधून आढळतात. परंतु असे दोष त्या वेळची स्थिति पाहिली असतां क्षम्य आहेत असें म्हटल्यास कवीची वाजवीपेक्षां जास्त तरफदारी केल्याचा दोष आमच्यावर येईल असें वाटत नाहीं. सारांश, अमृतरायाच्या कवितेंत दोष अगदीं थोडे आहेत व जे आहेत तेंही कवितेच्या बाह्यांगाच्या (प्रासानुप्रासाच्या) व अंतरंगाच्या (अनेक सुरसांच्या गर्दीत) वाचक गुंग झाला म्हणजे त्याच्या लक्ष्यांत येत नाहींत. याची शब्दयोजना अशी कांहीं सुरस, समर्पक, विपुलार्थसूचक, श्रवणमधुर व मनोरम आहे कीं याची कविता वाचीत असतां वृत्ति इतकी तल्लीन होते कीं दोषैकदृक् पुरुषाला आपल्या वृत्तीस चळवळ

करून देण्यास वावच सांपडत नाहीं. याच्या कवितेंत कांहीं जे दोष असतील–कारण निर्दोष असें कांहीं नाहीं–ते कोण्या सांदडींत दडून पडले आहेत हें समजत नाहीं.

अमृतरायाच्या कवितेविषयीं आम्हांस काय वाटतें हें सांगितलें आहे. तें 'भिन्न-रुचिर्हि लोकः' या न्यायानें कोणास अग्राह्य वाटेल, कोणास अपूर्ण वाटेल व कोणास अरुचिकरही वाटेल हें आम्ही जाणून आहों. यास्तव या लेखांत कोणास कांहीं गैर अथवा संशोध्य आढळल्यास मेहरबानी करून आम्हांस कळवावें अथवा छापून प्रसिद्ध करावें असें सविनय सूचवून अमृतरायाच्याच वाणीनें 'क्षणभर अमृत-मधुरगुण ऐका हो' [अमृतराय–पदसंग्रह–पद १५ पृ० १०३] अशी रसिकांस प्रार्थना करून प्रस्तुत लेखाची परिसमाप्ति करितों.

# THE POEMS

OF

# ANANDA-TANAYA.

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

JANARDAN BALAJI MODAK, B.A.

AND

VAMAN DAJI OKA.

PRINTED AND PUBLISHED

BY

THE PROPRIETOR

OF

THE "NIRNAYA-SÂGAR" PRESS,

BOMBAY.

1891.

Price 12 Annas.

महाराष्ट्रकवि-आनंदतनयकृत

# कवितासंग्रह.

हा

जनार्दन बाळाजी मोडक, बी. ए.

व

वामन दाजी ओक

यांनीं अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन शुद्ध केला.

आणि

मुंबईत निर्णयसागर छापखान्याचे मालक यांनीं आपल्या

छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

---

१८९१.

---

किंमत १२ आणे.

# अनुक्रमणिका

# आनंदतनयकृत काव्यें.

## रामचरित्रांतील आख्यानें.

### विश्वामित्राभिगमन.

(चूर्णिका.)

श्रीमत्सूर्यवंशसंभवभूपालमस्तकिंचा मध्यमेरुमणि, दीनमनोरथसंपत्तिपूरक चिंतामणि, भक्तभयापहारी, शमदमविलसितमुनिजनहृदयसदनविहारी, त्रिभुवनजनसुमतिनयनप्रतिबद्धकारण, निबिडतरदुरिततिमिरें[1] हरावया, परम दुर्मदरक्षोवृंदाचिया, प्रतापतपनस्पर्शमुकुलितसुरमनकुमुदावरि ज्योत्स्नो[2]ज्जृंभण कराया, क्षीरार्णवापासुनी, पूर्वदिशोदरीं श्रीराम चंद्रापरी, दशरथगुणसमुद्रापासुनी, कौसल्यागर्भगुहेमाजी अवतरला. ॥ १

नेणो तें विबुध[3]विभवभांडार प्रकटलें, कीं मनोहर मनुजाकृति सहस्रकरसहस्रतेज गोठलें, कीं किसलयसमकरकमलरुचिरपदकुवलयदलनिभ[4]नयनयुगलें, अतिमृदुपदतळ झळझळ तळपति, किळ बहुविधमणिगणखचित मुकुटतटी, छतपटविलसितकटी, सकलिं हि अवयविं नग झगझगिती, मघमघित विराजिती माळा, ऐशिया श्रीपुरुषोत्तमाला, अंकीं घेउनि खेळवी दशरथभूपाळ देवआगळा, मोक्षासि अटकरूप तुटली पुन्नामनरकींची अर्गळा, आनंदसमुद्रीं संक्रीडत घडिघडि रोमांच विजृंभती[5]. ॥ २

तों कोणेके अवसरीं, कनकनिकेतना[6]माझारी[7], जैसा द्विजगणांमाझारि कळाधरू[8], कीं पद्मिनीस्तोम[9]गणीं होय सहस्रकरू[10], कीं भूभृत्[11]कुलीं निजृंभमाण हेमधराधरू[12], दशरथ पृथ्वीवल्लभ लखलखित सिंहासनारूढ विराजे. ॥ ३

(श्लोक.)

तों, आकस्मिक तीव्र सेवक सभाप्रांतीं, नृपा वंदुनी,
वार्ता सर्व निवेदिती द्रुतगती, गाधेय[13] आला मुनी. ।
पायीं वाजति पादुका चटचटां; आपादमाथां जटा;
वाटे धूर्जटि[14] पातला; दशरथें तो देखिला भूतटा. ॥ ४

---

१. अंधकार. २. चांदणें. ३. देव. ४. सदृश. ५. प्रकटती. ६. गृह. ७. आंत. ८. चंद्र. ९. समूह. १०. सूर्य. ११. पर्वत. १२. मेरू. १३. गाधीचा पुत्र. (विश्वामित्र.) १४. शिव.

(अश्वधाटी.)

माला करीं, हृदयभालासि तें भसित, ज्याला मृगाजिन कटीं;
    लोला जटा रुळति डोला परी, परम कोलाहल ध्वनि उठी; ।
लीला अशी, म्हणुनि नीलालका सुकृतशीला तयासि नमिती;
    आला मुनी निजघराला म्हणूनि, मग झाला पुढें नरपती. ॥ ५
पाटीर हेममय वाटींत घे, विनय ताटीं फळें फुल जळें;
    हाटीं च, रत्नमय पाटीं, मुनीसपरिपाटी पुजी करतळें; ।
दाटी सहीत अग्रवाटीं अणूनि च, ललाटीं पुजी करतटीं;
    थाटी च ये स्तुति च माठीं, उदारतर भाटीं च भूप निकटीं. ॥ ६

(चूर्णिका.)

त्यानंतर वदनाभिरामवदनारविंदविलोकनपरिपूर्णमनोरथ, राय दशरथें कर्पूरकुसुमसुगंधगंधाक्षतकेसरादि परिमलद्रव्य, नानामुक्ताफलादि सुवर्णद्रव्य, परमपवित्र विचित्रचरित्र विश्वामित्र षोडशोपचारें पूजिला. ॥ ७

जोडोनि करतल, सुरसरिताजलविमलहृदय अजतनय सविनय पुसे, 'काय आज्ञा, अगा हे मुनिकुलप्राज्ञा ! भूतभविष्यवर्तमानत्रिकालज्ञा ! निगमागमसारपारज्ञा! जी जी सकलराजसंभारअगणिततुंगतुरंगमत्तमातंगसौधमंडित चतुःसमुद्रवलयांकित भूमी, हा विषय आपुला जी स्वामी! मज दासाप्रत सांप्रत मनोरथ प्रकटिजे'. ॥ ८

(दिंड्या.)

'ऐक राया! सौभाग्यघनाकाशा ! अम्हां काशासी दारधनीं आशा ? ।
काय योगी गुंतती मोहपाशा ? जिहीं वरिल्या संपत्ति अवीनाशा. ॥ ९
सौध सद्में आम्हांसि पर्णशाळा; स्फटिक रुद्राक्षा मुक्तमणीमाळा; ।
भस्म अंगीं पाटीर योगियाला; उणें केवीं वैराग्यवैभवाला ? ॥ १०
ऐक माझा वृत्तांत महीपाला! राक्षसांचा यज्ञांत उठे पाला. ।
विघ्न करिती मोडून यज्ञशाला; येथ आलों यालागिं धीविशाळा ! ॥ ११
यज्ञ रक्षाया दक्ष तुझीं बाळें; राक्षसांतें शासिती बाणजालें. ।
यागसिद्धी होईल शीघ्रकाळें; ऋषी होती संतुष्ट अल्पमाळें. ॥ १२
करूं शिकतिल त्वत्तनय सुसंग्रामा; कीर्ति शोभा येईल रामग्रामा. ।
पुन्हा येतों घेऊनि राम ग्रामा; पूर्णकामा कल्याणगुणग्रामा'. ॥ १३

---

१. भस्म. २. हरणाचें चर्म. ३. चंदन. ४. दशरथ. ५. वेदशास्त्र. ६. हत्ती. ७. गच्ची. ८. गृह. ९. मोती. १०. समूह. ११. बुद्धि. १२. अल्पानें. १३. गांव. १४. समूह.

'पुत्र द्यावा' हा शब्द पडे कानीं; खेद मोठा भूपाळ मनीं मानी. ।
शून्य मानी त्रैलोक्य राजधानी. 'काय मागा? हे थोर गमे हानी. ॥ १४
तपें केलीं निःपाप मुलांसाठीं म्यांहि संवत्सर सहस्र शतें साठी. ।
गुणीं[1] योजूं नेणती चापकोटी; राक्षसांशीं भांडतां लक्षकोटी.' ॥ १५
म्हणे, 'जी! जी! सर्वज्ञ! तपोरासी! कसे देऊं या सांग किशोरासी[2]? ।
नाहिं केला अभ्यास धनुष्याचा; मार्ग नेणे कीं मंत्ररहस्याचा.' ॥ १६
कथा ऐशी भूपाळ वदे कांहीं, 'मीचि येतों भीडण्या बळें बाहीं. ।
वाहिनींचा[3] संभार सुखें पाहीं. विघ्न हरती संदेह दुजा नाहीं. ॥ १७
राम नेदीं.' म्हणवोनि मुनीनाथा; पदें साकेताधीश नमी माथां. ।
उठे कोपें गाधेय 'तूज गोथा' म्हणे 'राया! निःसत्व वृथा चोथा. ॥ १८
माग आधीं बोलोनि सरे मागें, भूप ऐसा देखिला नाहिं मागें. ।
सुखें नांदें सूपुत्रपणें रागें.' करी डोळे विस्तीर्ण महारागें. ॥ १९

(श्लोक.)

'कशासि आम्हां धनवस्त्रभूमी? निष्काम निर्धूतभव प्रभो! मी. ।
केला मखीं[4] घोर निशाचरांनीं[5]; आलों कराया न निशा च रानीं. ॥ २०
अंभोजेक्षण[6], रामलक्ष्मण, तुझे हे, दक्ष रक्षोगणा
शिक्षाया, शत लक्ष लक्ष करिती एक्या क्षणीं मार्गणा. ।
हे द्यावे मज लक्षलक्षणनिधी संरक्षणाकारणें,
कांक्षे[7] नेघ[8] सपक्ष ही क्षितिपती त्वत्क्षात्र संरक्षणें. ॥ २१

(सवाई.)

केवळ हे सकुमार कुमार, बहू रजनीचरभार[9] वनीं;
युद्धमखीं रिपु वध्य न यांसि, असाध्य अबोध्य तिहीं भुवनीं; ।
नेणति हे परलोक, विलोक न कोकनदासम[10] पाणिपदें;
वंशि तुझ्या अवतंस[11] मुलें, मज संशय हा चि कसा न वदें. ॥ २२

(श्लोक.)

पायां नमीं, देइन वंशसारा[12]; पा यां न मी दे इनवंश[13] सारा. ।
न या वयामाजि[14] भला जनां दे. न यावया मीं[15] जिभ लाज ना दे.'॥ २३

---

१. दोरी. २. बालक. ३. सेना. ४. यज्ञांत. ५. राक्षसांनीं. ६. कमलनेत्र. ७. शंकेस. ८. घेऊं नको. ९. समूह. १०. कमल. ११. भूषण. १२. उत्तमांश. १३. सूर्यवंश. १४. वयामध्यें. १५. 'न'कार.

दशरथ नृप बोले 'राम नेदीं कदापी.'
मुनिवर मग बोले; कोपला तीव्रतापी. ।
'बहुत बहु बरें गा ! तूं सुखी पुत्रदारा-
सहित सदनि नांदें सूर्यवंशीं उदारा!' ॥ २४

वचन वदुनि ऐसें, चालिला चार पांडें;
तंव भुमिरव झाला, फूटलें जेंवि भांडें. ।
जलधिसहित मेरू आणि भूकंप झाला;
कुलगुरु नृपगेहा तीव्र धांवोनि आला. ॥ २५

(दिंडी.)

'बरें येतों' म्हणवोनि उठे, चाले; तदा झाला भूकंप, धरा हाले; ।
वसिष्ठादी धांवोनि ऋषी आले; 'कासया हे उत्पात नृपा! झाले?' ॥ २६

(श्लोक.)

वसिष्ठ बोले, 'न पडें अपायीं. द्यावीं मुलें शीघ्र, पडोनि पायीं. ।
हा कोपल्या जाळिल लोक सारा. कां नेणसी भूपति नीतिसारा?' ॥ २७

(दिंड्या.)

ज्ञानदृष्टी पाहोनि म्हणे, 'राया! भाव नेणें हो मनीं मोह माया. ।
रामचंद्रा देवोनि पडा पायां. विजयि तेणें होईल नव्हे वायां. ॥ २८
पुत्र देईं गाधेयकरीं आधीं. समाधानें कार्यार्थ बहू साधीं.' ।
गुरुवाक्यें परिसोनि सर्वसाधी; कौशिकातें भूपाल समाराधी. ॥ २९
रामसौमित्री वीर चापपाणी पदीं मुनिच्या लागती सौख्यखाणी. ।
ऋषी झाला सानंद सभास्थानीं. नामघोषें आनंदतनय वानी. ॥ ३०

## ताटकावध.

(श्लोक.)

रघुपती दिधला मुनिकारणें सह सुमित्र दुजा, अवधारणें. ।
मग नरेंद्र म्हणे, 'ऋषि कौशिका ! उभयतां प्रतिपाळ किजे निका.'॥ १
'नमुनि मुनिपदातें, लक्ष्मणा आणि रामा,
सरस यश वराया, देइं लोकाभिरामा. ।

---

१. दुःखी. २. पूजी. ३. वर्णी, ४. चांगला.

तनय नयगुणाचे शीघ्र घेवोनि येतों'.
सकृप नृप उठावे लोक सारा पहातो. ॥ २

धांवतां नृपति तीव्र गती घे. लागती मुनिपदाप्रति तीघे. ।
दीधला दशरथें सुत भावें. हांसला मग मुनी अनुभावें. ॥ ३

आनंदे मुनिवृंद सुंदर जयध्वानें अयोध्यापुरा
आशीर्वादुनि, साधु साधु वचनें, आले तदा गोपुरा. ।
वाद्यें वाजति भेरि दुंदुभि; सभासद्मीं गुढ्यातोरणीं;
नारी आरति आरत्या करिति त्या, जैशा रतीधोरणी. ॥ ४

संफुल्ल मल्लिकापुष्पें हर्षें वर्षति सुंदरा ।
भाट आघाट भाटी वा(?) भासती भव्य भूवरा. ॥ ५

थोपितां मुनिवरें सहसा रे, राहिले नृप जनादिक सारे. ।
चालिला त्यजुनि दूर अयोध्या. शौर्यमंडित समागमिं योद्धा. ॥ ६

जातां नीट, अचाट दाट अटवी वाटे दिठीं लक्षिती;
पक्षीश्वापद कूट थाट नटती, बोभाटती, लक्षिती; ।
सिंह व्याघ्र वृकादि सूकर मृगें दंती दरी राहती.
वृक्षीं पक्षि सहस्र लक्ष फिरती, हे कौतुकें पाहती. ॥ ७

दोघां दाशरथींस चालत पथीं शस्त्रास्त्रविद्या कथी.
जेणें चंड रथी रिपूस उलथी, पृथ्वी करी पालथी; ।
झाले शिक्षित वीर दीक्षितमुखें, तोषोनि, त्या कौतुका,
पायां वंदिति चापपाणि मग ते, शिष्यांसवें, देशिकां. ॥ ८

एवं राम, मुनींद्र, लक्ष्मण, तिघे गांभीर्यलीलागती
जातां, कौतुक एक अद्भुत दिसे; पक्षी नभीं लागती. ।
स्वैर श्वापदसंघ धांवति भयें, दंती दिगंताप्रती
जाती, लंघिति काननीं, 'कवण हा कोल्हाळ जी संप्रती ?' ॥ ९

'वारा कां सुटला ? निनाद फुटला ? कां देश बोभाटला ?
मेघाच्या पटलापरी उमटला पांशू नभीं दाटला ?' ।
बोले राम मुनीसि, पाय नमुनी, 'आज्ञा करा नेमुनी;
काळातें दमुनी, न सोडिन शरा क्षेमास्थिती कां मुनी ? ॥ १०

१. नीति. २. ध्वनीनें. ३. गृहीं. ४. मोगरी. ५. स्तुतिपाठक. ६ दृष्टीनें. ७. लांडगा. ८. डुकर. ९. हत्ती. १०. गुरु. ११. समूह. १२. धुरळा.

ऐशी व्याकुळ वाट कां ? मुनिवरा ! हे धांवती थाट कां ?
मोठा घोर अचाट कानन तटीं वंश क्षिती दाट कां ?' ।
'रक्षोरूप जुनाट कामिनि[1] फिरे, साधूजनीं कंटका;
ऐकें चिन्मयनाटका रघुपती ! आली दिसे ताटका'. ॥ ११

वार्ता ऐकाति रामलक्ष्मण अशी, तों धांवली कर्कशी
घोराकार, करालदंष्ट्रवदना, तद्दृष्टि बालार्कशी. ।
हाडांच्या अळुमाळ[2] डोलति गळां माळा, कटीं कांबळा;
जिव्हा लोळतसे मुखीं लळलळां, येते धरोनी बळा. ॥ १२

दंतीं चावित सिंह कुंजर मृगें, हातीं कितेकां धरी.
पातीं झांकुनि ऊघडी घडिघडी, माती कैंचाग्रांवरी[3]. ।
कोराकाटलिया मुखीं कटकटा, ढोरांचियां शोणितें
घोरावेशशरीर एक नटली, थोरा भया आणिते. ॥ १३

बाळें देखुनि रामलक्ष्मण, पुढें चाटी अवाळेपरी;
हुंकारी, क्षण हा करीत, तंव ते ऋढे, उडे अंबरीं. ।
अट्टाहासुनि, मट्ट मट्ट करिते, श्रीरामसंघट्टणीं
धांवे, तों क्षितिकंप, हा रव उठे देवांचिये पट्टणीं. ॥ १४

येतां सन्मुख राक्षसी लघुलघू, क्ष्मापालवंशाग्रणी[4]
क्रोधें दुर्धर वीर राम उठला, शिक्षावया तत्क्षणीं. ।
तूणीं बाण गुणीं धरोनि सहसा, कर्णात आणी, रणीं
हाणी, तों धरणीवरी उलथली, उत्साह धाता[5] गणी. ॥ १५

लागतां हृदयिं बाण खणाणा, ताटका उलथली च दणाणा; ।
त्या ध्वनीस्तव रवींदु गळाले; यक्ष राक्षस पिशाच पळाले. ॥ १६

नेणो कोसळला कडा, उमळला चंपद्रुमांचा थवा;
किंवा वज्रनिपातपर्वततटीं मानी मनीं माधवा. ।
होतां हृद्गत राम बाण, मिरवे मानें विमानावरी;
शोभे दिव्य शरीर, भव्य वचनीं रामस्तुती आदरी. ॥ १७

केव्हां कोठुनि घेतला शर करीं, केव्हां गुणीं योजिला;
केव्हां वोढुनि घातला चि न कळे, कीं वेगळा दाविला. ।

१. स्त्री. २. विस्तृत. ३. केंस. ४. राजा. ५. ब्रह्मा.

गेला सायक, पावकासम फिरे, तूणीमधें संचरें.
शौर्या साधुनि आर्यकार्य बरवी दासा स्थिती आचरे. ॥ १८
'हो जी! शोभत तूज राजरमणा! हो क्षेम या सायका.
हो कल्याण सदा तवांघ्रिकवचा, रामा! रमानायका! ।
हो जी! मंगल संगरांगणतटीं या बाहुदंडद्वया.
आशीर्वाद वदे असा मुनि तया सच्चिद्धना अद्वया. ॥ १९
केला जयध्वनि नभीं तयिं निर्जरांनीं. वर्षाव फुल्लसुम निर्भर जर्जरानीं. ।
थोवे मुखें स्तविति गर्जुनि सज्जनांचे; आनंदनंदन कवी मग सज्ज नाचे. ॥ १०

## विश्वामित्रयज्ञरक्षण.

(श्लोक.)

त्यानंतरें मुनि म्हणे, 'विजयाभिरामा! आतां चला निजपथेंचि विपद्विरामा. ।
यज्ञाविना दिवस विप्र न ते सहाती. सिद्धाश्रमीं सकळ वाट तुझी पहाती. ॥ १
निष्कंटका वनतती भुजविक्रमानें केली, द्विषद्वधु वधूनि पराक्रमानें. ।
ऐसेचि येथुनि निशाचर ते क्रमानें मारूनि, राज्यधर हो, प्रभु! शक्रमानें. ॥ २
हे ताटिका वनमृगादिजिवांसि कांटा, होती वनीं करित भक्षुनि पाप सांठा; ।
हे राक्षसी कुलतरूंतिल एक फांटा त्वां तोडिला; तरु समग्र तुझा चि वांटा.' ॥ ३
नेली शुंभवधू वधूनि विलया, हे मात पैं मातली
देखे दृष्टिसि, पुष्पवृष्टि गगनीं देवावली पातली. ।
गाती किंनर, कीर्ति वर्णिति मुखीं अत्युन्नता कंधरीं.
कीजे भारिव थोर वाटिव तुझी गंधर्वविद्याधरीं. ॥ ४
आली पूर्ण कळावयासि सकळां नागां मृगां हे नगा.
झाला उत्सव, ऊर्ध्व पुच्छ करुनी, जाती अगा हे नगा. ।
ऐसा दावित तोष, भावित मनीं चाले मुनी बोलतां.
'जी स्वामी!' म्हणती धनुर्धर पथीं ते चालतां चालतां. ॥ ५
तेव्हां राम पुसे, पुढां वन दिठी देखोनि दूर क्षिती;
'शोभे शाद्वल, पुष्पकुड्मल फळीं शाखा खगा रक्षिती. ।
वल्ली, गुल्म, सुफुल्ल पल्लव, तरू व्योमीं च उंचावले.
मोठें चित्रविचित्र पाहुनि दिठी आलोक लांचावले. ॥ ६

---

१. अग्नीसारखा. २. बाण. ३. पाय. ४. देवांनीं. ५. शुंभाची स्त्री. (ताटका.) ६. नेत्र.

या हिंडती निबिड तें मृग विप्रदेशीं; झाडातळीं घन निकुंजतरू विदेशी.' ।
'माझ्या सख्या! समज आश्रम हा च, लाहो घेती मृगादिक हि, आश्रम हा, चला हो.'७

तोषे राघव, दोघ जे निरखिती आरण्य उत्तुंगसें;
जेथें व्याघ्रमृगें, मृगाधिपकरी, जाती, फणीमुंगसें, ।
जाती स्वैर, जनासि वैर मिळुनी प्रेमास्पदें रक्षिती.
तों येती द्विजराज सन्मुखगती त्यांतें दिठी लक्षिती. ॥ ८

जे आश्रमीं सकळ वाट पहात होते, आले मुनी जवळि, जोडुनि हात, हो ते. ।
तेजोभरें तपनरूप तपोनिधी ते, ज्याचा स्वधर्मरत शुद्ध तपोनि धीतें. ॥ ९

ते जों वंदिति गाधिनंदनपदा, त्यांच्या पदा वंदिती
राजीवेक्षण रामलक्ष्मण, तयां ते गाढ आलिंगिती. ।
ऐशीं देत, यथाविधि, प्रतिपदीं आलिंगनें, वंदनें,
जाती; तों रघुराज आश्रम दिठी पाहे, वनें पावनें. ॥ १०

कुंजीं गुंजति पुंज पुंज अलिंचे, मंजु ध्वनी गुंजती.
बर्हीं ते नटती, कपोत घुमती, त्या कोकिला कूजती; ।
हंसादि द्विज झंकृती, वृकशिवासिंहादिंच्या हुंकृती,
कुंभी भीष्कृति, सर्प फूत्कृति, वनीं तैशा च नानाकृती. ॥ ११

ऋषी सांगे, 'रामा ! बहु दिवस मी एथ चि असें;
तपें जाती सिद्धी, म्हणुनि पद सिद्धाश्रम असे. ।
महर्षी ते हर्षें तप करित सानंद वसती;
परंतु श्रीरामा ! निशिचरकुलध्वंसवसती. ॥ १२

येति संघ बहु पापजडांचे; देख हे ढिग अनेक हडांचे; ।
भक्षिलीं द्विजकुळें अवलोकीं; राक्षसीं कपटकृत्रिमलोकीं.' ॥ १३

ऐशी सांगत मात, हात धरुनी, ते पातले शालिका.
येती सन्मुख विप्र आणि सुमुखी विप्रांगना बालिका. ।
त्यांहीं, पाय धुवूनि, अर्चुनि, यथान्यायें च, नीराजना
केली राघवलक्ष्मणासि, हृदयीं आनंद संजीवना. ॥ १४

गेले ब्रह्मसभेस, सर्व बसले, राजे महालक्षणी.
'आतां यावरि काय तें चि गुरुजी ! आज्ञापिजे ये क्षणीं.' ।
कौसल्येय वदे; तदा मुनिथवे उल्लासले ईक्षणीं.
तों गाधेय म्हणे, 'समर्थ चि तुम्हीं साधू जगद्रक्षणीं. ॥ १५

यज्ञारंभ उद्यां, सहा दिवस या कर्मा मिती, तों वरी
  आम्हा लीन असा, महा नियम हा, शालाप्रवेशावरी.
यज्ञीं विघ्न करावया प्रगटती, त्या दुष्ट रक्षोगणा
  रक्षीं, रक्षुनि धर्म, धार्मिकमती! सज्जीं धनुर्मार्गणा.[1] ॥ १६

त्यानंतरें गाधिकुमार दीक्षा धरी, मखीं कर्म शिखीसमक्षा. ।
शिक्षावया राक्षस लक्ष साठी दीक्षा धरी, रामनृपाळ मोठी. ॥ १७

रचून ते मंडप कुंड वेदी, तत्तद्विधी ज्ञाननिधी निवेदी. ।
गाधेय आधीं सुमुहूर्त साधी; आराधितां अंतरिं वृत्ति साधी. ॥ १८

व्योमीं होमसुधूम भूमि भरतां, उद्दाम वेदध्वनी
  दिग्देशीं घुमला, महोत्सव भला आरंभला तद्दिनीं. ।
गेल्या पांच निशा अशा; मग दिशा, आकाश, हे मेदिनी,
  आले व्यापित ते निशाचर तशा पूर्णाहुतीच्या दिनीं. ॥ १९

आला मारीच मारा करित च गगनीं, ऊर्ध्वबाहू सुबाहू,
  हाहू गर्जे चमू तों, प्रभु शर चढवी राम आजानुबाहू. ।
होतां टंकार, शंका धरिति रिपुकुळें, काळघंटा म्हणूनी
  मूढा हुंकार हुंकारुनि उठति दळें, चंड शत्रू गणोनी. ॥ २०

आले वर्षत अस्थिमांसरुधिरा जों स्तोम होमावरी,
  तों आधीं च सवेग मार रचुनी बाणोत्करीं सांवरी; ।
वाराही न शिरे, अणू न विचरे, ऐसा चि भारी गुरू
  मांडी मंडप कांडमंडिततळीं कोदंडदीक्षागुरू. ॥ २१

आले शुंभ, सुबाहु, अन्य हि, तसा मारीच, अभ्रीं उभे.
  सेना ही ककुभेमधें पसरिली, कापट्यकर्मीं दुभे. ।
खालीं, यज्ञसभेंत, सुज्ञ मुनि तो शोभे सवें वल्लभे,
  कीं ज्याला न लभे चि भीति, भजतां यज्ञक्रिया दुर्लभे. ॥ २२

काळे कर्कश मेघसंघ गगनीं फांकोनि झांकोळले;
  तैसे दाहि दिशा निशाचर महासंदोह आंदोळले; ।
द्वारीं राघव दोघ लाघवगती टंकारितां कार्मुकें;
  तेणें घोर घन प्रघोष घुमतां ते कांपती कौतुकें. ॥ २३

---

१. ब्रह्मांड. २. दिशा.

म्हणे राम तो लक्ष्मणा बंधुराया, 'क्षणामाजि निर्दाळितों मी धुरा या; ।
उगा तूं पहा कौतुकें बाणलीला.' म्हणे तों चि आरंभ झाला कलीला.॥ २४

गाढा वीर गुढारल्या निजरथीं संमूढ आरूढला.
मारीचाख्य पुढारला, भुजबळें झुंजावया रूढला. ।
तों रामें महज्जास्त्रमंडितशरें वक्षस्थळीं ताडिला.
तेणें शंभर योजनें उडविला, सिंधूतटीं पाडिला. ॥ २५

कांहीं चिंतुनि कार्यभाग न वधी; रक्षी तयातें बळें;
तों आला सहसा सुबाहु समरीं, संगें दळें तुंबळें; ।
तो उद्दंड अतिप्रचंड चढवी कोदंड रामावरी;
श्रीरामें रणकर्कशें निरखिला तो ये पुढें तोंवरी. ॥ २६

आला सन्मुख तो रिपु प्रमुख, तों लीलालघू लाघवें,
आग्नेयास्त्र नियोजुनी निजशरीं, संप्रेरिलें राघवें. ।
तेणें चूर्ण चि शीर्ण तूर्ण पडली भूमी तनू, लोटली.
वर्णूं काय ? सुखार्णवीं जग रिघे, टाळी सुरीं पीटली. ॥ २७

(सवाया.)

प्रभु बाहुजकुलमणि[1], बाहुनि समरिं सुबाहुसि दमुनि च, बाहु करें,
अजि बाहुनि, विरदल बाहुनि, गुरु शर बाहुरहित करि बाहु नरें. ।
हयवारणगत परिवार न मग अनिवार उठति परिवार तते.
अनिवार हि चढति सवार, धरुनि तरवार, करिति परि वारति ते.॥२८

रघुवीर, नृपतिकुलहीर, सुभट, रणधीर, निबिडतर तीर जमा
शरभार गगनिं अनिवार रचुनि, भडिमार करित सुकुमार कमा. ।
रिपुधूर उठति भरपूर, सकळ अविदूर भरिति शरपूर तदा.
चकचूर करिनि कर ऊर चरण शिर सूरकुलज[2] रणशूर तदा. ॥ २९

अरिनिकर निकट, गजतुरग शकट जंव करिति लगट, रघुरमणकरीं
शर सुटति सणण, रव उठति खणण, रिपु पडति दणण, रणधरणिवरी. ।
वरि वदति अमर, 'अजि! असम समर करि नृपतिकुमर, जय विजयि भला.'
गजबजति असुर, दरि दडति निसुर, मग वसुमतिसुर[3] परिवंदि सकळा.॥३०

मनिं धरुनि पडप, नभिं लपुनि गडप वरि हाणिति झडप, रिपुनिकर करें.
परि रघुपविशिख तळपुनि नखशिख तनु खिळति सनखशिख शिखिसम रे.।

---

१. क्षत्रियकुलश्रेष्ठ. २. सूर्यवंशांतील. ३. ब्राह्मण.

रणनिपुण सुधड रिपु पडति दुधड, तृण धरिति उघड मग रदनिकरें.
सुर वदति 'विजय', नर म्हणति 'अभय', मुनि नटति निलयतटिं निजगजरें. ३१

(श्लोक.)

गेला राक्षस सर्व भार विलया, संपूर्ण यज्ञक्रिया
झाली, सिद्ध समस्त ही अवभृथस्नानादिक प्रक्रिया. ।
विश्वामित्रमहाऋषिप्रमुख ते सारे सभामंडळीं
श्रीराम स्तविती, पराक्रम असा नाहीं च आखंडळीं. ॥ ३२

'बोद्धा, शस्त्रशरास्त्रमंडित, महायोद्धा, अयोध्यापती
श्रद्धालु प्रभु यज्ञदेवविबुधीं वृद्धासहा संपती. ।
बद्धां मोचक तूं च साच' म्हणुनी बद्धांजळी राघवा
सिद्धार्थी द्विजसंघ वर्णित उभे, सिद्धाश्रमीं आघवा. ॥ ३३

गार्धेय गर्जत वदे, 'रघुरामचंद्रा! झालों कृतार्थ बहु, चित्तचकोरचंद्रा! ।
गेला चि तो विहित यज्ञ समग्र सिद्धीं; सिद्धाश्रमासि तरि आज खरी प्रसिद्धी'. ॥ ३४

'जी! जी!' म्हणे रघुकुलेश्वर 'आणि कांहीं आज्ञापिजे, दमिन ये क्षणिं आणिकां ही;।
निष्टंक कार्य कथिजे, तव किंकरांनीं कीजेल जी! मग असाल निशंक रानीं'. ॥ ३५

ऐकोनि हें, निजभुजीं ऋषिराजराजी आलिंगिती हृदयिं बाणधनुर्धरा जी. ।
'कल्याण हो, परम मंगल हो, कृपाळा!' तो सर्वशोभन म्हणे द्विजदेवपाळा. ॥ ३६

सारें सारुनि नित्यकर्म, करुनी देवार्चनें, भोजनें,
देती हारतुरे, विडे, मग उटी धूपादिदिव्यासनें; ।
संफुल्लायतलोचना, शशिमुखी, त्या ब्राह्मणी नायका,
आनंदें, मग आरत्या करिति त्या रामा जगन्नायका. ॥ ३७

आतां पुढील रचना परिसा कशी ते; भंगोनि चाप रघुराज वरील सीते. ।
निर्दोष हे करिल रामकथा मनातें; आनंदनंदन कवी विनवी जनातें. ॥ ३८

## सीतास्वयंवर.

(श्लोक.)

चिद्वाग्यें अथिला विदेह मिथिलाभूपाळ भूपावली
पाचारूनि, विचारुनी मनिं, कथी साचार वाचावली.

१. यज्ञसमाप्तिसमयींचें स्नान. २. इंद्राचे ठायीं. ३. समूह. ४. ज्ञानभाग्यानें. ५. आश्रय केलेला. ६. जनक. ७. नगरविशेष. ८. नृपसमुदाय.

'जो हें त्र्यंबकचाप भूप उचली, त्या आपुली कन्यका
केली अर्पण, हें समर्पक वरा, हो नोवरा जी निका.' ॥ १

हें ऐकोनि निकें, सकाम सकलक्षोणीपती पातले;
जैसे देव महेंद्रमंडितसभे येती मदें मातले. ।
यत्नें त्या जनकें सुरत्नकनकें शृंगार रंगांगणीं
केला, केवळ कौतुकें, मग सभा व्यापे नृपांच्या गणीं. ॥ २

राजे अंगकलिंगवंगमहिचे काश्मीरकर्णाटकी
गौडी गुर्जर निर्जरोपम सभे आले भले नाटकी. ।
राजा धार्मिक 'शर्वकार्मुक' म्हणे 'आणा सभामंडळीं.'
आज्ञा मानुनि मुज्ञ सेवकगणीं तें आणिलें अंगणीं. ॥ ३

(चूर्णिका.)

जैसे सकल कुलाचल मिळाले एक्या स्थळीं, कीं लक्षावधि प्लव वारांनिधि-जळीं, कीं कामरूप पन्नगभार पाताळीं, कीं नानाविमानसंघ गगनमंडळीं, कीं नानाफलसमूह टाहळीं, तेविं मुकुटांगदकेयूरकटकमुक्ताहारतोडरनूपुरहंसकादि भूषणीं विराजमान भूपाल, जनकसभामंडळीं, सकळही एकवटले. ॥ ४

पूर्वी भार्गवदत्त जें, बहु वरें, भारी, घरीं मांदुसे
होतें अर्चित धूपदीपकुसुमीं जें इंद्रचापा रुसे. ।
जें सातां शकटीं, महाबळकटीं, वाहूनि, बाहुबळें
चालीं चालविलें सभेसि सकळीं, जें शैलशृंगागळें. ॥ ५

मत्तेभ, मल्ल, हय, बैल, हेले, धनुष्या लावूनि ओढिति, बळें नढळे मनुष्यां.।
गाड्यांसि त्यासि दृढ बांधुनि चारि नाडे आकर्षिती, धरुनि हर्ष, म्हणोनि नाडे.६

गाडा ओढिति 'बाप बाप' म्हणुनी, तें चाप सापापरी.
धापा देत नृपाळही उतरले भूपांत नानापरी. ।

१. शिवधनुष्य. २. धावयाचें वस्त्र. ३. उत्तम. ४. कामातुर, आशाभरित. ५. पृथ्वीपती. ६. गर्वे. ७. समुदाय. ८. देवांसारिखे. ९. शिवधनुष्य. १०. हिंदुस्थानांतील सात मुख्य पर्वत. ११. नौका. १२. महासागर. १३. सर्प. १४. समुदाय. १५. बाहुभूषणें. १६. प्रगंडभूषण. १७. कडीं. १८. चरणभूषण. १९. शोभायमान. २०. परशुरामानें दिलेलें. २१. पेटींत. २२. गाडा. २३. पर्वतशिखराहून अधिक. २४. मातलेले गज. २५. घोडे. २६. रेडे. २७. दोर. २८. न अडे.

राजे देखुनि दंग भंगति मनीं; 'सारंगनेत्री कशी
होते लभ्य?' म्हणोनि सभ्य वदती. राजा बलातें केशी. ॥ ७

हेमाद्रीवरि हेमनिर्मित जशा संफुल्ल वेली भल्या,
तैशा आभरणीं अपार तरुणी सौधांगणीं शोभल्या. ।
मध्यें कल्पकवल्लरीसम दिसे शीतांशुबिंबानना
सीता शीलवती शुभा, नृपसभा लक्ष्मी जना कानना. ॥ ८

वार्ता वार्तिक कीर्तिती प्रभुपुढें 'जी! जी! धराधीश्वरा!
आले गाधिनृपाळनंदन पुरा, संगें ऋषींचा फेरा.' ।
हें आकर्णुनि, पूर्ण तूर्ण त्रिभवज्ञानार्णव, क्ष्मापती
चाले सन्मुख, सप्रधान, अवघे मागें पुढें धांवती. ॥ ९

रायें दूरुनि देखिल्या ऋषिघटा, माथां जयांच्या जटा;
शाटी बंधन, वल्कलाजिनें पटा, त्या पादुका वाजटा. ।
शुद्धाच्छ स्फटिकाक्षहार डुलती, भूति प्रभा बोलती;
सारे चित्रचि साग्निहोत्र झुलती, आनंदलें चालती. ॥ १०

(चूर्णिका.)

ऐशिया ऋषिराजसमूहामाझारी विराजमान, विद्वज्जनसार्वभौम, विमलांतःकरण, विश्वविख्यात, महानुभाव, सिद्धाश्रमविहारी, जो महातपाचा तेजोराशि, परंतु उदयास्ता वेगळा; आल्हादकारक कलानिधि, परंतु वृद्धिक्षयारहित, नित्यागळा; अत्यंत समर्थ शतक्रतु, परि नातळत परदारपातकविटाळा; सृष्टिकर्ता चतुरानन, परंतु निजदुहितागमनदोषासि निराळा; असो. ऐसा परमपवित्र विश्वामित्र सुकृतराशि, स्वयंवरमहोत्सवविलोकनविलासी, धर्मादिसद्गुणोत्कर जनकें विदेहदेशाधिपजनकें, देखोनि, साष्टांग दंडवत वंदिला. ॥ ११

१. मृगनयनी. २. कसास लावी. ३. पुष्पित. ४. वेली, वनस्पती. ५. राजगृहांगणांत. ६. चंद्रबिंबमुखी. ७. उत्तमस्वभावाची. ८. जनरूप अरण्यास. ९. वार्ता सांगणारे भाटबंदीजनादि. १०. हे पृथ्वीपते. ११. गाधिराजसुत. (विश्वामित्र.) १२. समुदाय. १३. ऐकून. १४. त्वरित. १५. पराक्रम आणि ज्ञान यांचा सागर. १६. पृथ्वीपती. १७. ऋषिसमुदाय. १८. छाटी, वस्त्रविशेष. १९. कौपीन. २०. मृगचर्म. २१. वाजणाऱ्या. २२. अत्यंत स्वच्छ. २३. काचमणी आणि रुद्राक्षहार. २४. उदार. २५. सूर्य. २६. चंद्र. २७. इंद्र. २८. ब्रह्मदेव. २९. पुण्यराशि. ३०. सद्गुणांची खाण.

(श्लोक.)

'बा! रे! हो विजयी' म्हणे मग मुनी, 'सारे धरे हो धणी.'
थारे भूत सदा यदंघ्रिभजनीं, तारेशवंशाग्रणी, ।
मोठा वेदविधीस जो, मग तशा सोळा विधीं पूजिला
भोळा शंकरसा; चला म्हणवुनी डोळा खुणें योजिला. ॥ १२

अत्युद्दाम भले भले क्षितिपती रायें पणीं गोविले;
मानें आदरिले, सभे बसविले, टेले बिले नेविले. ।
ज्ञानें पूर्ण अगाध गाधिसुत जो वेधा जसा बैसला.
पाठीं तो ऋषिथाट दाट नटला, पद्मासनीं बैसला. ॥ १३

जो कल्याणगुणी गुणीच अगुणी, भूतें मणी ज्या गुणीं;
ज्याच्या रूपगुणीं सदा गुणगुणी शंभू रिघे निर्गुणी; ।
सृष्टी चित्त गुणीं जयास्तव गणीं, माया जया ठेंगणी;
तो कोणा न गणी, वसे ऋषिगणीं, श्रीराम रंगांगणीं. ॥ १४

जो वाहे धरणी, प्रपंच भरणीं वानीत वाग्वोरणी;
देवाची करणी, प्रतिप्रकरणीं लुब्धे जगत्कारणी; ।
जो कां आदि फणी, विषें फणफणी, रत्नें जयाच्या फणीं;
तो रामानुज रामचंद्रनिकटीं शोभे सभारंगणीं. ॥ १५

(सवाई.)

या परिचे भवतापविमोचन, चापशरांकित, भव्यमती,
पाहुनि, सर्वनृपांहुनि उत्तम, लाहुनि तोष, पुसे नृपती; ।
'कोण असे महिपालक बालक? हे जनचालकसे सुचले;
सांग मला सहसा, गमनाशय चांग मनासि मला रुचले.' ॥ १६

(श्लोक.)

हांसोनियां नृपसभे मुनिराज बोले. स्वानंदसंभ्रमभरें हृदयांत डोले. ।
'हा जी नृपा! बहुत भाग्य जगीं उदेलें; यांच्या गुणें दुरित दैन्य समस्त गेलें. १७

सांकेताधिपबाल हे; रणतटीं रक्षोगणा काल हे;
दीनाचे कनवाळ हे; प्रतिपदीं राया! जगत्पाल हे; ।

---

१. ज्याचे पाय. २. चंद्र. ३. षोडशोपचारें. ४. अतिगर्विष्ट. ५. विधि. ६. दोरींत. ७. शेष. ८. रामभ्राता (लक्ष्मण.) ९. नवल. १०. अयोध्यापतिदशरथपुत्र. ११. राक्षससमुदाय.

पूर्ते हे शुभलक्षणी, रत सदा धर्मैकरक्षणीं[1];
आनंदाब्धि अनुक्षणीं[2] भरतसे, यांच्या कृपाईक्षणीं[3]. ॥ १८

यांहीं दुःसह ताटिका निर्वटिली[4]; निष्कंटका मेदिनी
केली काननिं; यांचि हो शरगती पाताळभूभेदिनी; ।
तो मारीच[5] नभीं झुगारुनि शरें, केला सुबाहू पुरा;
नेला सिद्धिस यज्ञ; तें प्रवर[6] हे आले तुझ्याही पुरा. ॥ १९

चापा नृपा! आणि महोत्सवातें आले पहाया बल वैभवातें; ।
मार्गी अहल्या विपिनांत रामें केली शिला मुक्तमनोभिरामें.' ॥ २०

परिसुनि मन राया दाटलें रामपायीं;
म्हणत मनिं, 'करावा सोयरा हा उपायीं; ।
कठिण तरि पणाचा व्यर्थ संकेत केला;
रघुवर नवरा हो धन्य या कन्यकेला.' ॥ २१

भूपातें निरखी दिठीं[7], निजसखीसंगें रमेसारिखी
शोभे, तेविं उखी विखी शशिमुखी माडीवरी पारखी; ।
झाली बुद्धि फिकी, नृपाकृति निकी मानीचना आन कीं,
लक्षी राघव, कौतुकीं तंव तुकी माथा मनीं जानकी. ॥ २२

(पद.)

'कोण तुझ्या मनासि येतो, सांग हो सीते!' ॥ ध्रुवपद. ॥
'पैल कुसुंबी दुस्तर[8] त्याला?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'पांघुरला नवरंग दुशाला?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'विड्या देत हडपेकर ज्याला?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'माथां मंदिल झळकत शेला?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥ १ ॥
'तोरा बहुवस पैल तुऱ्याचा?' 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'मनोहराकृति मदन, वयाचा?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'त्याला पोशाक कंदर्पाचा?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'अभिनवकंकणहस्त जयाचा?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥ २ ॥

---

१. धर्माचरण करणाऱ्याच्या. (हा प्रयोग जुन्या काळांतील दिसतो. जसें, यात्रेकरू इ० यात्रा करणारे.) २. क्षणोक्षणीं. ३. कृपायुक्त नेत्रांत. ४. मारिली. ५. राक्षसविशेष. ६. श्रेष्ठ. ७. दृष्टीनें. ८. उत्तम. ९. दुसरी. १०. हालवी. ११. वस्त्र.

'पद्मासनि करिं धरुनि कटारी?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'त्याला बारिक दस्त दुतारी?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'गौर धराधिप त्या शेजारीं?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥
'दिक्करिसा नृप दोंदिल भारी?' । 'बाई! तो काय नव्हे.' ॥ ३ ॥
'तो ऋषिमंडळि दिव्य धनुर्धर?' । तेव्हां न ह्मणे नव्हे. ॥
'मेघःशाम श्रीराम मनोहर?' । तेव्हां न म्हणे नव्हे. ॥
'दाशरथी नृपराज धनुर्धर?' । तेव्हां न म्हणे नव्हे. ॥
'आनंदात्मज पूर्ण परात्पर?' । तेव्हां न म्हणे नव्हे. ॥ ४ ॥
'आणली निज ग्रुण तन्मय तुझी गे मीते!' ॥ कोण तुझ्या० ॥ २

(श्लोक.)

'जो शोकाब्धितरी, नतांभि उतरी, तत्पादपद्मीं तरी
क्रीडें मी भ्रमरी, म्हणोनि अमरी मानीन तें पामरी; ।
कैसें मज करी धनू झडकरी? हे फार चिंता करीं;
मातें कोवि वरी?' म्हणोनि विधुरी माडीवरी नोवरी. ॥ २४

हा वरी मज अशी गती चिंता आवरीन कशि? लागलि चित्ता. ।
बावरी मति कशि स्थिर राहे? यावरी सुचवि मात धरा हे. ॥ २५

'चतुर म्हणविसी तूं, बोलसी काय सीते?
वरिन म्हणसि रामा मातही कायसी ते?' ।
बहुत दिवस बापें नेमिलें या पणातें.
रघुपति पति होता तो कसा आपणातें? ॥ २६

ऐशी ते वदतां वधू, मग पुढें कैशी कथा वर्तली,
जैशी चंडमरुद्वरें वनतटी, तैशी सभा नर्तली. ।
शंकाहीन, मदें महोद्धत, महा हंकार ज्याचा भला,
डंका दुंदुभि वाजवीतचि सभे लंकापती पातला. ॥ २७

वेष्टिला वट जसा विटपांनीं, ये भुजीं निबिड तो विट पानी; ।
दंष्ट्रमंडित तया मुखरा जी रांजते मदभरें मुखराजी. ॥ २८

१. हत्तीसारखा. २. प्रणतजनास. ३. देवांगना. ४. नाच. ५. विचार करी. ६. वेडी. ७. गोट. ८. प्रचंड वायूच्या जोरानें. ९. नटली. १०. डाहळ्यांनीं. ११. धूर्त. १२. दाढांनीं शोभायमान. १३. तोंडाळ्यास. १४. शोभते. १५. मुखपंक्ति.

(सवाई.)

दैत्य धुरंधर तो दशकंधर[1] जो नृपगंधिरजास[2] न साहे;
मस्त समस्तहि मस्तक डोलवि, हस्त गदांकित हालविताहे; ।
धीट सभांतरिं नीट रिघोनि, अवीट बसे, कवणास न साहे;
ढाल फिरंग[3] विशालधनू शर चालत चालवि दोनहि बाहे[4]. ॥ २९

व्यग्र[5] नृपाल समस्त सभेंत उदग्र[6] दशानन लक्षितसे;
वंदिति सर्वहि बंदि जसे, परि नंदिसमान उगाचि बसे; ।
पर्वतसंनिभ[7] गर्वनिधी मग सर्व सभे 'पण काय' पुसे;
तों लघु नम्र सखोल सभापति बोलत बोल तया मृदुसे. ॥ ३०

'या चापा ऐक बापा! चढविल गुण जो पूर्ण आकर्ण[8] राजा;
हे कन्या त्याचि धन्या कृतिसि निरविली[9] साच त्याचीच भाजा.' ।
लंकालंकार तेव्हां दशवदन वदे, 'ऐक ऐकैक[10] माझ्या
लीलेचा खेळ राया! न पुरति सुर ते चंडदोर्दंडकाजा[11]. ॥ ३१

दंतीं ज्यां देवदंती[12] धरुनि मुरडिला; शैल कैलास गोटा[13]
घेतां हस्तीं समस्तीं कडकडति कडे; काय ती काळदाढा? ।
तेथें या कांबिटाचा[14] गरिव गुण किती? प्रौढिही कोण येणें?
माझे गाजोनि भोजे[15] म्हणति मज असा कायसा कास घेणें? ॥ ३२

पाहीन डोळां नवरी वराया; आणा' म्हणे रावण राव, 'राया.' ।
विदेह बोले, 'जिर्णतां[16] पणानें वरील ते आपण आपणातें.' ॥ ३३

लंकानायक सायकासन गुणीं सज्जावया सज्जला[17];
तों सीता भयकंपिता; जन महाचिंतांबुधीं मज्जला; ।
झाल्या म्लानमुखी मनोरम[18] सखी, तो जों भुजा सांवरी;
तों आकार विकार देखुनि उठे हाकार माडीवरी. ॥ ३४

तो जेव्हां कडकावला धनुवरी, ठेला उभा भूतसा,
सीतेला धडका उठे निजमनीं कीं बोलवेना तसा; ।

१. दहा ग्रीवा ज्यास. २. राजांच्या वासाच्या लहान कणास. ३. तरवार. ४. बाहू. ५. व्याकुल. ६. उंच, क्रूर. ७. पर्वतासारिखा. ८. कर्णपर्यंत. ९. दिधली, नेमली. १०. एक एक. ११. प्रचंडभुजांच्या कार्यास. १२. ऐरावत. १३. अचल, दृढ. १४. लघुत्ववाची धनुष्यार्थी शब्द. १५. भुज. १६. जिंकतां. १७. तयार झाला. १८. मनोहर.

'पण कासयासि जनकें केला सख्यांनो! असा?
कैसें कारण काय कीं, कटकटा, आतां प्रयत्नीं असा. ॥ ३५

वीरासनी, कनककार्मुकबाणपाणी टेंकूनि ढाल, कर घालुनियां कृपाणीं, ।
जो बैसला द्विजगणांत कलानिधी तो म्यां आपणें प्रणियला गुणवारिधी तो.॥ ३६

रघुपतिजलधीतें मी नदी जाण वाहें;
उचित म्हणुनि त्याचें वाक्यही आण वाहें. ।
जननिजनककानीं गूज हो! जाणवा हें.
न तरि सखि न ठेवीं प्राण मी आण वाहें. ॥ ३७

पण म्हणुनि पित्यानें घातला कोण पाया?
कवण वधु वरीते कश्मला कोणपा या?' ।
सखि म्हणति, 'धरीते बुद्धि हे तूज सीते!
पुरविल परमात्मा बुद्धि हेतू जशी ते. ॥ ३८

हा कोण शैवधनुपारखि येर मेला; हा काय योग्य तुज सारिखिये रमेला; ।
कीं हेमवल्लिसुरधामतरूपमानें तूं आणि राम जनसंमत रूपमानें.' ॥ ३९

सौधांगीं बिबुधांगनाचि वदती तैशा सख्या तीप्रती;
तों तेथें भुजराजिमंडिततनू आला धनुष्याप्रती; ।
शेषाकार अशेषभूषणगणीं शृंगारिलें देखिलें;
दृष्टीं कार्मुक रोंखिलें, मग मदें तेणें हळू लेखिलें. ॥ ४०

हातें थापटिल्या भुजा, 'मज असा नाहीं त्रिलोकीं दुजा,
मेरूही मजशीं खुजा, सुरवरीं माझीच आधीं पुजा.' ।
ऐसा जल्पुनि, चाप जाड, उचलों जातां, न हाले कदां.
जैसा शैल मतंगजासि न ढळे. पाहे विदेहात्मजा. ॥ ४१

एका दों नढळेचि कार्मुक करें, हें नेटकें जों कळे,
लावी हात बळें समग्रहि, तदा, तों काहिंसें आकळे; ।
मोठी आरभटी करूनि, चुकटी दंतावळी चावुनी,
आक्रोशे, अतिविक्रमें, क्षितितळीं जानुद्वया लावुनी. ॥ ४२

---

१. सुवर्णधनुष्यबाण हातां ज्याच्या. २. तलवारीच्या ठायीं. ३. चंद्र. ४. वरिला. ५. गुणसमुद्र. ६. पाप्याम. ७. राक्षसास. ८. सुवर्णवल्ली आणि कल्पतरू यांच्या उपमेनें. ९. माडीवर. १०. देवस्त्रिया. ११ बाहूपंक्तीनें शोभायमान देह ज्याचा तो. (रावण.) १२. लहान, क्षुद्र. १३. सीता. १४. ओढाताण.

विसां करांहीं धनु तें न तोले; न सांवरे यास्तव देह डोले;।
भारें तयाच्या बहु खाय झोले; त्याहीमधें रावण काय बोले. ॥ ४३

'या भूपें पण जिंकिला; उभविलें कोदंड चंडाकृती;
मद्दोर्दंड उदंड दंड करिती; शाबास माझी धृती; ।
डोले, बोलत बोल, तों न धरवे, गेलाचि झोला भला;
आलें चाप अपाप त्यावरि उरीं, तो भूतळा पातला. ॥ ४४

आला भूमितळासि गर्वपुतळा, पिंजारुनि कुंतळा;
चापातें उखळावया बळ खळा नाहींच उत्संखळा; ।
सर्वांगींच कळा, विटे मुखकळा, झाला भुजामोकळा;
वाजे ऊर गळा, स्वदेह सगळा झिंझाडितां आगळा. ॥ ४५

ओकी रक्त भडाडुनी, दडपतां वक्षःस्थळाची फळी;
सर्वांगें ढकली, न लेशहि ढळे, भूमी भुजा आफळी; ।
शेखीं देखुनि अप्रयत्न, जनकें दीर्घप्रयत्नें दया
केली, ओढुनि काढितां शिवधनू, देखे स्वभाग्योदया. ॥ ४६

झाला रावण सावधान, बसला, 'पाहों' म्हणे कौतुकें,
'आतां कोण गुणीं धनू चढवितो? मी हीन झाल्या तुकें;' ।
झाले दंग नृपालपुंगव सभेमध्यें तदा आवघे;
आश्चर्यें स्तविती, कितेक नमिती, कोणी न तो आव घे. ॥ ४७

नाचे विख्यात राजा, म्हणुनि कुवलयोल्लासकर्ता कळांहीं
सर्वांहीं पूर्ण जो कां, हरुनि तम सदाकाशसंचार पाहीं; ।
शंभूला वंद्य माथां, अमृतकर विभू, जो द्विजांमाजि सांद्रा
योग्यां उत्साह दावी, निरखिति सखिया तैशिया रामचंद्रा. ॥ ४८

गेला माज, दमूनि माज पडतां त्या राजराजानुजा;
राहे राजसमाज मंद, सुभटांमाजी नुठे कीं दुजा; ।
सारे स्वस्थ तटस्थ, कीं नृप म्हणे, 'व्यर्थ प्रतिज्ञा मुखें
केली म्यां न कळोनि, केवळ धरा निर्वीर मानूं सुखें. ॥ ४९

---

१. धैर्य. २. केंसास. ३. उचलावयास. ४. शेवटीं. ५. दोरीच्या ठायीं. ६. श्रेष्ठ. ७. सर्व. ८. धैर्य. ९. कमलांला उत्साह देणारा. १०. निबिड. ११. कुबेरबंधु. (रावण.)

सप्तद्वीपपती, महाबळनिधी, सोत्कंठ, आले असे;
सीता हेमलता वरी जरि, तिये कीर्तीसि जोडा नसे; ।
ओढीना, न झडी धरूनि तुळवी कोणी, न तोली बरा.'
निःसंदेह विदेह गर्जुनि म्हणे, 'निर्वीर झाली धरा.' ॥ ९०

बोले शब्द उणा विदेह; पिसुणामध्यें तदा त्या गुणा
घेती; तों निपुणाभिराम, करुणासिंधु, प्रभू, पाहुणा, ।
गांभीर्यें वेरुणालयाहुनि दुणा; दात्री गुरुतें खुणा;
दृष्टीनें अरुणा, म्हणे, 'चढवितों या चंडचापा गुणा.' ॥ ९१

'निर्वीरा धरणी' म्हणे घरधणी, 'गोंवूनि राजे पणीं;
ऐसा शब्द झणी वदो नृपगणीं; भू हे सुवीराग्रणी, ।
मेरूतें गगनीं झुगारिति जनीं, आहेति ऐसे मणी;
नेणे कीं अवनीपती' म्हणतसे श्रीराम वीरासनी. ॥ ९२

'दे आज्ञा शिवसायकासन गुणीं योजीन मी, आयका.'
बोले, वंदुनि पाय, कामजनिता, योग्यांचिया नायका. ।
आनंदें मुनिनाथ भेटुनि भुजीं, स्पर्शोनि हस्तांबुजीं,
गर्जे, 'हो जयवंत देवमनुजीं हो भो! जया बाहुजीं.' ॥ ९३

ऐसा मित्रकुलाब्जमित्र वदतां, तो मित्रसा लोभला;
विश्वामित्र म्हणे, 'अमित्रदमना! रामा! भला रे! भला; ।
होसी चंड पराक्रमी चतुरधी चंडांशुवंशोद्भवा!
त्वद्दोर्दंड अखंड होत विजयी, घे कीर्ति चिद्वैभवा.' ॥ ९४

आनंदें फुगला नसेचि उगला, गाधेय गर्जे सभे;
'कां कोणी न करी धृती झडकरी? प्रौढी न लाभे प्रभे? ।
आतां दाशरथी, महोज्वलरथी, राजा! अजी! या जया
वांछी, चाप कशी, मनीं स्थिति कशी? पाहूं म्हणे राजया.' ॥९५

(चूर्णिका.)

विश्वामित्र म्हणे, 'रामा! नूतननीलधाराधरश्यामा! ऋपिजनमनच्चकोरसोमा!

---

१. उणें पाहणारांमध्यें. २. समुद्राहून. ३. आरक्त. ४. पृथ्वीपति. ५. मदनाचा पिता राम. ६. क्षत्रियांत. ७. मित्रकुळरूप कमळाला सूर्य. ८. शत्रुमर्दना. ९. सूर्यकुलोत्पन्ना. १०. तुझे भुज. ११. गाधिपुत्र. (विश्वामित्र.) १२. ओढी.

सुरसार्वभौमा! परमदृढमृडकोदंडचंडाभिमानखंडनपांडित्य[1] दाखवीं; सकळ-भुवनवीरद्विरदमुखीं अद्भुतेक्षुरस[2] चाखवीं; निजकीर्तिचंद्रिकैया[3] ब्रह्मांड झांकवीं; क्षित्युद्भवरत्न[4] जानकी संतोषवीं; लीलाभूषणीं कविवाग्वधूसि भूषवीं; सीतामुखासितांशुरसपानचतुरचकोर व्हावया उठावें, उठावें.' ॥ ९६

(श्लोक.)

'जी! जी! याहुनि लाभ काय?' म्हणुनी भूपाळची जृंभला.
चित्तीं संभ्रम, थोर उत्सव, महा आनंद, आरंभला. ।
तेव्हां हास्यमुखें, तपोधन, सुखें डोलोनि, बोले, 'गुणीं
योजीं चापलता, धरीं चपळता, प्रौढ प्रतापीं गुणीं. ॥ ९७

वीक्षारक्षितसज्जना[5]! करिं धनुर्वल्लीपरीक्षा, गुरू[6]
किंवा फार हळू पहा, निजकरें, कोदंडदीक्षागुरू! ।
भूकन्या तरि अन्य भूमिपतितें ना लोक धन्या वरी;
ते मान्या मिरवे मृगांकवदना[7] माडीवरी नोवरी.' ॥ ९८

(चूर्णिका.)

तेव्हां राजाधिराज, राजीवनयन[8], विराजमान, रघुराज, वीरशार्दूळ, उठावला; कार्मुकोपकंठप्रांत[9] पावला; जैसा उरगावरी पतंगराज झेंपावला; गंभीर धीर, भुज थापटुनि, लीलाबाळखेलनापरी कमठकठीण नीलकंठकामटा[10] मुठीं मुठाळोनि, वामकरें सधरसित शरासन ओढिलें; झिंझारवें त्रिवार झाडिलें; क्रिंकार ध्वनि तूर्ण[11] पूर्ण आकर्ण[12] ओढिलें; तंव मध्यभाग मोडूनि कडकडिलें; तत्प्रतिध्वनिभरें गगन गडाडिलें; भू तटतटीत, खटखटीत कृतांतदळ[13], दिग्गज डगमगित, फणिवर[14] सचकित, थक्कित दिनकरशशधरादि तारामंडल, बहु शंकित पंकजभव[15], खळबळित सुरासुरकुळ, डळमळित सत्यलोक पाताळ, वितुळत घनपटल, चळचळ कांपत बलशीलभूपाल, लोकपाल व्यथितभूत असतां, मूर्च्छाभर जलचर-खेचरादिक समस्तां, भेरीदुंदुभीपटहकाहलादिक नानाविधें मंगलतूर्यें सुरलोकीं उल्हास परमानंदभरपुरें, एक्याच काळीं, धिमधिमायमान धमकतीं झालीं. ॥ ९९

तंव मिथिलेश्वरचित्ताचळातें[16] विस्मयाद्यानंदोर्मी[17] माजवी; भला भला म्हणोनि

१. अत्यंत कठिण शिवधनुष्याच्या महाभिमानाचे खंडनाविषयीं पांडित्य. २. उत्तम उंसाचा रस. ३. चंद्रिका (चांदणें) याची तृतीया विभक्ति. ४ पृथ्वीपासून उत्पन्न. ५. अवलोकनानें रक्षिले सज्जन ज्याणें. ६. मोठें. ७. चंद्रमुखी. ८. कमलनेत्र. ९. धनुष्याच्या जवळचा. १०. धनुष्य. ११. त्वरित. १२. कानापर्यंत. १३. यम. १४. शेष. १५ ब्रह्मा. १६. जनकाच्या चित्तरूप पर्वतानें. १७. लहरी.

